# मुक्त्यारीसमारंभ

अथवा

# श्रीमन्महाराज शाहूछत्रपति, सरकार करवीर यांचा राज्याधिकारस्वीकारोत्सव.

हें पुस्तक,

**बाळाजी महादेव करवडे,**

हेडमास्तर, पट्टण कोडोली, पेटा अळतें, इलाखा कोल्हापूर,

यांनीं केलें.

तें

**मुंबई येथें**

जावजी दादाजी

यांच्या 'निर्णयसागर' छापखान्यांत छापिलें.

सन १८९६ इ.



किंमत १ रुपया.



श्रीमन्महाराज शाहूछत्रपति.

To

HIS HIGHNESS

# THE SHAHOO CHHATRAPATI,

MAHARAJAH OF KOLHAPOOR K. C. S. I.

THIS LITTLE WORK HAS BEEN MOST

RESPECTFULLY DEDICATED

BY

THE AUTHOR.

---

श्रीछत्रपति शाहूमहाराज, सरकार

करवीर,

यांस

त्यांचे परवानगीनें

हा ग्रंथ

ग्रंथकर्त्यानें परमादरपूर्वक अर्पण केला आहे.

# प्रस्तावना.

श्रीमन्महाराणी विक्टोरिया, मलिकामाअझमा केसर दि हिंद यांच्या आश्रयाखालीं जीं लहान मोठीं अनेक मांडलिक संस्थानें हिंदुस्थानांत आहेत, त्यांपैकींच दक्षिणमहाराष्ट्र देशांत कोल्हापूर हें एक मराठी राज्य आहे. ह्या राज्याचे अधिपति चवथे शिवाजी महाराज हे कैलासवासी झाल्यावर श्री० जयसिंगराव आबासाहेब घाटगे यांचे चिरंजीव यांस महाराणी विक्टोरिया एम्प्रेस ऑफ् इंडिया यांच्या आज्ञेवरून ता० १७ मार्च १८८४ इ० रोजीं दत्तक घेतलें व त्यांचें नांव शाहूमहाराज असें ठेविलें. शाहूमहाराज राज्यारूढ होतेसमयीं त्यांचें वय सुमारें दहा वर्षांचें होतें, तेव्हांपासून सार्वभौम सरकारांनीं यांचा विद्याभ्यास वगैरे चांगला व्हावा ह्मणून यांजला शिक्षक, उपशिक्षक व यांस राजकुमार कॉलेज तसेंच धारवाड वगैरे ठिकाणीं ठेवून अभ्यास उत्तम करविला. महाराज प्रौढ झाले व राज्यशकट चालविण्यास योग्य झाले अशी राणीसाहेबांची खात्री झाल्यावरून त्यांच्या आज्ञेनें मुंबई इलाख्याचे गव्हरनर नामदार लॉर्ड हॅरिस साहेब सहपरिवार कोल्हापुरास येऊन त्यांनीं ता० २ एप्रिल सन १८९४ इ० रोजीं महाराज यांस मुक्त्यारीचीं वस्त्रें दिलीं.

हा समारंभ मोठ्या थाटाचा झाला असून चित्तवेधक, मनोरम व वर्णनीय आहे. असा समारंभ माझ्या पहाण्यांत कधींच आला नाहीं. सुमारें तीस वर्षांपूर्वीं श्रीमं० बाबासाहेब महाराज यांस मुक्त्यारीचीं वस्त्रें मिळालीं. तो समारंभ मीं पाहिला (त्या वेळीं माझें वय १०।११ वर्षांचें असावें.) त्या वेळीं दीपोत्साहाचा थाट, दारूकाम, मंडळीचा जमाव वगैरे कोणत्याही प्रकाराविषयीं पाहिलें असतां हल्लींचा समारंभ अत्युत्तम झाला हें निर्विवाद आहे. ती हकीकत स्मरणाकरितां कवितारूपानें वर्णन करावी असें वाटल्यावरून हें लहानसें टिपण यथामति

लिहिलें आहे. ह्या समारंभाच्या संबंधानें शहरांत जिकडे तिकडे आरास, नूतन राजवाड्यांत मुक्त्यारीचे संबंधानें झालेला बडा दरबार, व त्यांत झालेलीं नामदार साहेबांचीं व श्री० छत्रपति महाराज यांचीं महत्वाचीं भाषणें, उत्तम प्रकारच्या चार कमानींचा देखावा, दीपोत्साह, लंका वगैरे अनेक गोष्टी घडल्या त्या अपूर्व आहेत; सबब सर्व गोष्टी वर्णन करण्यासारख्या आहेत. ज्याचे छायेखालीं आपण आहों, ज्याची चाकरी करितों, ज्याचें अन्न खातों, अशा त्या श्री० शाहूछत्रपति महाराजांचे मुक्यारीचे वर्णनाचें काव्यरूपानें केलेलें पुस्तक शाळाखात्याचे उपयोगीं असून सर्वत्र मनोरंजक होईल असें मनांत आणून या मनोरम उत्सवाच्या कविता केल्या त्या—साक्या, दिंड्या, संगीत चालीचीं अनेक तऱ्हेचीं पदें, कटावें, कांहीं वृत्तांचे श्लोक, अंजनीगीतें, आर्या, अभंग, वगैरे अशा प्रकारांनीं रचिलें आहे. ह्यांत बड्या दरबारांतील गव्हरनर साहेबांचें भाषण व श्री० महाराज सरकारांचें भाषण, प्रोग्राम, हें जसेंच्या तसेंच उतरलें आहे; तसेंच रयतलोकांच्या मानपत्राच्या वेळचीं भाषणें, जाहिरनामा, एवढ्यांच्या मात्र कविता नाहींत. कालिदास, शेक्स्पियर, गेटी वगैरे महान् कवि होऊन गेले. कालिदासासारखा शीघ्र कवि व समयास पाहिजे तशी कविता तत्काळ आपल्या अलोट कौशल्यानें रचणारा असा दुर्मिळ आहे.

सर्व कविवृंदांचा मुकुटमणि होऊन बसलेला जो विख्यात शेक्स्पियर त्याच्याशीं कालिदासाची तुलना करून सर्वांनुमतें ठरविलें कीं 'कालिदास हा हिंदुस्थानांतील शेक्स्पियर असें समजलें पाहिजे.' विख्यात गेटी यास तर गायनकलेनें वेड लावून टाकिलें; त्याप्रमाणें संस्कृतभाषाभिज्ञ महान् कवि होऊन गेले, त्यांच्याशीं साम्यता मीं यःकश्चित प्राकृत कवितेनें करीन ह्मटलें तरी ईशप्रसादावांचून होणें अशक्य

१ संगीत किर्लोस्कर यांचे काव्यास अनुसरून.

आहे; व विद्वज्जनांपुढें मीं काव्यकौशल्य दाखवावें अशी माझी योग्यता नसून प्रयत्न केला तो गुणज्ञ लोकांस मान्य होवो.

आतां, या समारंभाचे कवितेंत कारणपरत्वें कोठें कोठें व्यक्तिनिर्देश करून वर्णन करणें भाग पडलें; यावरून कोणीही मनांत असें आणूं नये कीं, 'आमचें वर्णन ह्यांत नाहीं. जर प्रत्येक व्यक्तिमात्राचें वर्णन करूं ह्मटलें तर, महाभागवत किंवा भारत, या ग्रंथांयेवढा ग्रंथ होईल, करितां तसें करण्याचा प्रसंग आणला नाहीं; यावरून इतरांनीं श्रम केले नाहींत, किंवा विद्वान् नाहींत, असा माझे मनांतील भाव मुळींच नाहीं. याकरितां ते केलेल्या विनंतीकडे लक्ष देतील.

या पुस्तकांतील कांहीं निवडक भाग मे० रावबहादुर जोशी चीफ् जज्ज यांस मीं वाचून दाखविले तेव्हां त्यांनीं मला कांहीं माहिती सांगितली व उत्तेजन दिलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

हें टिपण करेक्ट करण्याचे कामीं मेहेरबान खानबहादुर दिवाण साहेब सी. आय्. ई. सरकार करवीर यांनीं मला माहिती दिली व उत्तेजनही देऊन सुधारण्याचा मार्ग दाखविला याबद्दल मी त्यांचा खरोखर फार आभारी आहें.

ता. १० सप्टेंबर सन १८९९. — बाळाजी महादेव करवडे, हेडमास्तर, पट्टण कोडोली, पेटा अळतें.

यांत ज्या गोष्टींची हकीकत लिहिली आहे त्यांचा तपशील.

जगन्नियंत्या परमेश्वराची प्रार्थना—स्वतंत्र राज्याची स्थापना करणारा जो शककर्ता शिवाजी त्याची स्तुति—कोल्हापुरचे शिवाजी ऊर्फ बाबासाहेब महाराजांपासून ते हल्लींचे महाराजांपर्यंत मुक्त्यारी कोणाकोणास मिळाली होती वगैरेबद्दल माहिती—मुक्त्यारीबद्दल जनवार्ता—चिंचलीप्रदर्शनांतील गव्हरनर साहेबांचें भाषण—शर्करा वांटली—मुहूर्ताचा निश्चय—मुक्त्यारीचे संबंधानें तयारी—निमंत्रणचिठ्ठ्या—राजेरजवाडे, संस्थानिक, जहागीरदार समारंभास येतात. ठरल्याप्रमाणें

ता० १ ए० रोजीं इंग्रजी १० वाजतां नामदार गव्हरनर येतात. स्टेशनावर आगतस्वागताकरितां कौन्सिलर आणि बडे बडे सरदार मे०पो० ए० वगैरे जातात—नामदार रेसिडेन्सीच्या बंगल्यांत उतरतात—एडिक्यांप वगैरे महाराजास भेटीकरितां पाचारण करितात—स्वारी जाते—कुशलप्रश्न—तोफांची सलामी—दक्षिणेच्या संस्थानिकांच्या भेटी—भोजनसंबंधानें कोणकोणते अधिकारी नेमले ते प्रोग्राम—मुक्त्यारीसंबंधानें दरबार,—दरबारास बडे बडे लोक व विद्वान् व अधिकारी येतात—लॉर्ड हॅरिससाहेब येतात व त्यांचें साग्र भाषण—महाराजांचें भाषण—हारतुरे; स्वारी अंबिकेच्या दर्शनास गेली—जाहिरनामा—जिकडे तिकडे मजा—रयत लोकांचें मानपत्र—ब्राह्मणभोजन—रमण्याची दक्षिणा—साहेबलोकांचा खाना—चिराखदानी—अतसबाजी—नामदारांचे परिवारासह फोटो काढून घेतात—जहागीरदारांचें मानपत्र—पुण्यांतील दक्षिणेंतील सरदारांचें सभेकडून पहिलें मानपत्र—याप्रमाणें नऊ मानपत्रें—महाराजसरकारचा फोटो काढून घेतला—जगद्गुरु व बडोदेकर यांनीं अहेर केले—त्रिचनापल्लीच्या कामगारांचा अहेर—वारांगनानृत्य—युरोपियन लोकांचा बॉल—राजवाड्यांतील विद्युद्दीप—नवीन पाहुणेमंडळीसाठीं दरबार—कामगार लोकांचें भोजन—नामदारांचा महाबळेश्वराकडे कुच—त्यासंबंधानें भेटी—शिष्टसंभावना—सरदार लोकांना अहेर—छत्रपतींचे सन्निध असणारे भालदार वगैरे लोकांस उंची उंची पोषाख—कुस्त्या—मुलांस मिठाई—राजाराम विद्यार्थ्यांचें मानपत्र—परिशिष्ट—विद्वज्जनांस प्रार्थना—सकल जनांस प्रार्थना—ईश्वरप्रार्थना.

विद्वान्, अमलदार वगरे लोकांपैकीं कितीएकांनीं साग्र पुस्तक वाचून व कांहीं लोकांनीं पांचही भागांतील ४०।५० पर्यंत सुमारें कविता ऐकून व कांहीं भाग स्वतः वाचून मनोरंजक असल्याबद्दल आपापल्या मताप्रमाणें इंग्रजींत—शेरे दिले आहेत; ते पुढें आहेत.

A specimen of opinions given by some gentlemen of high post is given below.

I was pleased to hear many of the songs in Mr. Karavade's description of the Installation week. The verses regarding the Khasbag Mandap feast of the Brahmins are very amusing. I am not very fond of sangit nor a connoisseur in it, still the very account is attractive.

Rajaram College, 17-1-95. (Sd.) V. G. Bijapurkar. M. A. Act. Professor of sanscrit Literature.

---

I heard some of the verses sung by the author, & went through others myself. I think that they please more when they are sung than read.

Kolhapur. 19-11-96 (Sd.) B. V. Khandeker, B. A. Tutor to Kagal Chief (Junior).

---

I have read some of the poems in this pamphlet and found many of them amusing and funney. The writer had better avoided so close an imitation of Kirloskar's songs.

23rd Nov. 1885. (Sd.) G. B. Joshi B. A. L. L. B.

---

Mr. Karavade's poems are good. They recall to the mind that happy week.

23rd Nov. 1895. (Sd.) R. N. Apte. M. A. L. L. B. Professor of Mathematics.

---

Mr. Karavade read to me some select portions from his verses describing the Installation ceremonies and I found them interesting. Mr. Karavade is an old class fellow of mine and I should like to see him receive proper encouragement in his undertaking.

Kolhapur, 24th Nov. 1895. (Sd.) Rao Bahadoor. B. N. Joshi. B. A. L. L. B. Chief Judge, Kolhapur.

---

I agree with what has been said above by Rao Bahadur Joshi. I have pointed out to Mr. Karavade some passages which require correction in regard to details therein given. On the whole I think this will be a valuable record of the Installation of H. H. and the author deserves encouragement in his undertaking.

24th Nov. 1895. } (Sd.) Khan Bahadoor M. Kuvarji. C. I. E.
Divan Kolhapur.

---

मि. रा. रा. बळवंत रावजी करवडे, मास्तर, यांच्या कविता पाहिल्या. चांगल्या आहेत. लहान मुलांस ह्मणण्यास चाली सोप्या जातील अशा चांगल्या आहेत. व शाळेंतील विद्यार्थ्यांस ह्मणण्यास अडचण येणार नाहीं.

ता. २३ नोव्हेंबर १८९५. } बळवंत पोहरे,
गवई, निसबत सरकार करवीर.

---

I heard some select portions here and there by the author. They are simple songs such as would. amuse the general public and commemorate the auspicious occasion. I pointed to the author some inaccuracies of language, construction, metre, sentiment &c. which would require correction if the collection is to be presented to the Public. A work of the kind suck as Mr. Karavade has attempted was much needed and the author deserves patronage and encourgement for having taken great pains to supply the want according to his abilities.

24th Nov. 1895. } (Sd.) V. B. Gokhale. B. A. L. L. B.
Asstt. Judge.

---

The author read some portions of his verses to me and I was really very much pleased with them.

Kolhapur. 30th No. 1895. } (Sd.) Rao Bahadur R. K. Waidya.
Revenue Commissioner &
Member of Council.

---

# मुक्त्यारीसमारंभ

अथवा

# श्रीमन्महाराज शाहूछत्रपति, सरकार करवीर यांचा राज्याधिकारस्वीकारोत्सव.

## भाग पहिला.

श्रीमत्छत्रपति शाहू म० यांचा जयजयकार असो.

॥ श्लोक ॥ वृ० स्रग्धरा.

शक्ती शांती सुकीर्ती सुमतिच बरवी स्थैर्य दातृत्व राहो ॥
गांभीर्यातेंचि धैर्या विजय बहुगुणां ज्ञान औदार्य वाहो ॥
आयुर्वृद्धी सुचीरा ध्रुवसमचि असो श्रेष्ठ जो शाहु त्यातें ॥
पाहू पुत्रांसि लोभें, सुखवुचि नयनीं पौत्र तैसें प्रजांतें ॥ १ ॥

शककर्ते शिवाजींचें संक्षेपें वर्णन.

॥ श्लोक ॥ वृ० शार्दूलविक्रीडित.

दुष्यंतासम कीर्ति शोभत असे, ज्याचीच भूमंडळीं ॥
आयोध्यापति रामरायसम जो भासे जनांतें बळी ॥
शौर्यातें बघुनी कसे यवन ते कंपीत होती मनीं ॥
गाजे भव्य शिवाजि शक्ति गमते तत्तुल्य नाहीं जनीं ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० ॥ नको हरि निशिं बाहिर जाऊं गवळणि तुज धरू ब.

ज्याची श्रद्धा धर्मावरती हिंदूंच्या बहु राहीली ॥
देवस्थानें सर्वहि ज्यानें म्लेंच्छांपासुनि रक्षियलीं ॥ ध्रु० ॥ ज्या०
यवनमंडळी ऐकुनि शौर्या, ज्याच्या कंपित अति झाली ॥
ऐशी ज्याची कीर्ति महीवर अजरामर ती राहीली ॥ ज्या० ॥ १ ॥

गोब्राह्मणप्रतिपालक ऐशा डंक्यानें महि दुमदुमली ॥
भ्रष्ट होय ती प्रजा ह्मणुनियां, यवनांपासुनी सोडविली॥ ज्या० २
रामदास गुरु याच्या वचनीं, विश्वासें मति ठेवियली ॥
अष्टप्रधानांदिक ते नेमुनी, पद्धति घालुनी ज्या दिधली ॥ज्या०॥
मदनांतक त्रिपुरारि वदति जन, ज्यातें सकलहि मुखकमळीं ॥
गजवदनाचा तातचि भासे, रामनाम तें हृत्कमळीं ॥ ज्या० ॥ ४ ॥
त्या शिवाजिस आधीं नमुनी, काव्यरचना मग केली ॥
त्याच वंशांतिल हा शाहू कीर्ति ज्यानें गाजविली ॥ ज्या० ॥ ५ ॥

॥ साकी ॥ राग–जोगी ता० धुमाळी.

परम मनोहर मुक्त्यारीचा उत्सव तो देखीला ॥
काव्य रचीतों संक्षेपानें, दुष्कर जें मम मतिला ॥
बुद्धीदात्यासी ॥ नमुनी हेरंबासी ॥ १ ॥

पूर्वी मुक्त्यारी ज्यांस मिळाली असे श्री० बाबासाहेब महाराज यांजबद्दल.

॥ दिंडी ॥ राग लीलांवरी ता० दादरा.

सूर्यवंशीं शिवछत्रपती राया ॥
राणि अहिल्या सद्गुणी ज्याचि जाया ॥
त्यास वस्त्रें दीधलीं मुक्त्यारीचीं ॥
जगीं वानीती धन्य कीर्ति ज्याची ॥ १ ॥

यासमारंभापेक्षां हल्लींचा समारंभ उत्तम थाटानें जहाला ह्मणून वर्णनीय आहे.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

सन अठराशें त्रेसट सालीं, ज्यातें वस्त्रें दिधलीं ॥
मुक्त्यारीची शोभा नयनीं कविनें ह्या देखीली ॥
अंतर दीर्घचि तें, दोहोंतचि भव्य कसें दिसतें ॥ १ ॥

॥ आर्या ॥

कालातें अनुलक्षुनीं होय समारंभ साजिरा तेव्हां
उपमेसि तुल्य गौणचि, प्राचिन उत्साह पाहिला जेव्हां ॥ १ ॥

श्री. राजाराम महाराज गादीवर असतांना मुक्त्यारीचा प्रसंग आला नाहीं.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

छत्रपती जो राजाराम तो राज्यपदीं असतांना ॥
नाहीं ऐकिली किंवा हरिली, तहानभूक बघतांना ॥
वस्त्रें मुखत्यारी, जयाची शोभा दिसे भारी ॥ १ ॥

महाराज विलायत पाहून आल्यावर, मुक्त्यारी मिळणार, असें ठरलें होतें; इतक्यांत आमच्या दुर्दैवानें आह्मां प्रजाजनांवर आकाशांतून कुऱ्हाड येऊन ढांसळली.

॥ पद ॥ राग. ललितगौरी ता० धुमाळी ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला ॥

राज्यव्यवस्था अवगत व्हावी, विलायतेची बरी ॥
ह्मणुनी नृप मानुनि अंतरीं ॥
जाई तिकडे दुर्दैवें मग, अवचित आह्मांवरी ॥
पडला परशू आंगावरी ॥
अंग जयाचें भंग होउनी संग कोण आवरी ॥
वायुनें अर्ध तनू बावरी ॥ १ ॥

॥ आर्या ॥

नृपउत्साहार्थचि जन, रायाचा मार्ग चातकापरि ते ॥
पहाते झाले तंव तों, आयकिलें साग्र मरणवृत्तातें ॥ १ ॥

सर्व प्रजाजन पुनः मुक्त्यारीचा प्रसंग कसा व कधीं येईल याबद्दल खेद करितात.

॥ पद ॥ चा० ॥ मज बहुतचि ही आशा होती वहिनी.

जन सारे ते, दुःखित झाले श्रवणीं ॥
वार्ता ती ऐकुनी सदनीं ॥

कधिं येइल तो, भूपचि हा दूरूनी ॥
आयकिली दुःखद वाणी ॥ चा० ॥
फल पक्कदशे जें आलें हो ॥
निर्दय त्या कालमुखीं पडलें हो ॥ चा० ॥
हतभाग्याचे सर्व असुनियां स्थानीं ॥
कधिं पाहूं उत्सव नयनीं ॥ १ ॥

श्रीछत्रपतींची प्रकृति तर अस्वस्थ असल्यामुळें त्यांस उत्सवाचा समारंभ कसा प्राप्त व्हावा ?

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

याच भूपतिचा तनय जो शिवाजी ॥
रूपसौंदर्यें प्रजा ज्यासि राजी ॥
परी त्यासी घेरिलें चक्रावर्तीं[1] ॥
भ्रमाच्याही नष्टती देहस्थीती ॥ १ ॥

॥ आर्या ॥

विपत्तिकालांतचि या रायाचा अंत तो कसा झाला ॥
स्थितितें पावुनि ऐशा पावे कैसा सभाग्य मानाला ॥ १ ॥

हल्लींचे महाराज गादीवर बसल्यापासून प्रजाजन मुक्त्यारीउत्सवासाठीं चातकाप्रमाणें वाट पहातात.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

राज्यपदारुढ शाहू जेव्हां चवऱ्यांशि सालीं झाला ॥
तैंपासूनी हस्त जोडुनी प्रार्थिति त्या देवाला ॥
ह्मणती जन देवा ॥ प्रीतिनें उत्सव तो पहावा ॥ १ ॥

मुक्त्यारीबद्दल प्रजाजनांचे उद्गार.

॥ पद ॥ राग-पिलू ता० धुमाळी. ॥ चा० ॥ उद्धवा शांतवन कर जा.

जन बडबड बहुतचि करिती ॥ उत्सवार्थ मनिं माने ती ॥ ध्रु० ॥
जाउनी इंग्लंदाला ॥ पाहुनी त्या राज्याला ॥

---

१ भ्रमाचे चक्करीं.

स्थिति रीति वाटे मनाला ॥ जी योग्य असे सकलांला ॥
स्वीकारुनि त्या वस्तूला ॥ दावावी प्रेमें जनांला ॥ चा० ॥
जनकताताइच्छा ऐशी ॥ होइ ती विफलचि कैशी ॥
मुक्त्यारिप्राप्ति मग तैशी ॥ आज्ञेनें सहजचि होती ॥ १ ॥

लोक कंटाळून परमेश्वराची प्रार्थना करितात.

॥ पद ॥ चा० ॥ भूपाळी. (उठिं गोपालजी जाय धेनूकडे ) या चा०

प्रौढ नृप जाहला ॥ विद्या बहु लाधला ॥
देशही पाहिला ॥ बहुत यानें ॥ १ ॥ प्रौढ० ॥ ध्रु० ॥
मद्रासीं जाउनी ॥ सीलोना पाहुनी ॥
काशिखंडाहुनी ॥ नृपति आला ॥ प्रौ० ॥ २ ॥
हेतु धरुनी मनां ॥ सोडुनी आसना ॥
पूर्ण करि वासना ॥ फिरुनि राष्ट्रीं ॥ प्रौ० ॥ ३ ॥
वस्त्रें द्यावीं आतां ॥ योग्य त्या ऊचिता ॥
समयही अवचिता ॥ प्राप्त जाहला ॥ प्रौ० ॥ ४ ॥

इतक्यांत चिंचली येथें प्रदर्शन ता० ४ माहे फेब्रुवारी सन १८९३ इ० रोजीं झालें. त्यांत नामदार लार्ड हॅरिस गवरनर साहेब यांनीं आनंदप्रदर्शक भाषण केलें तें.—

साकी—राग जोगी ता० धुमाळी.

चिंचलिप्रदर्शन झालें जेव्हां ज्यांणव सालीं तेथें ॥
हॅरिस लार्ड गवरनर तो प्राप्तचि झाला जेथें ॥
मानुनी आनंदा ॥ लागति सर्व हितछंदा तत्छंदा ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० ॥ उद्धवा शांतवन कर जा.

रमणीय समय पाहूनी ॥ बहु प्रेम मनीं आणूनी ॥
मेजवानि त्या देऊनी ॥ मृदुभाषणि ज्याची वाणी ॥
भूपती रत्नाची खाणी ॥ तुष्टला गवरनर बघुनी ॥ चा० ॥
आनंदें हॅरिस त्या वेळीं ॥ संभाषण बोले सुकाळीं ॥
ऐकुनी श्रोत्रें निमाळीं ॥ समयातेंही साधूनी ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० ॥ प्रीतीस पात्र कोण तुझ्या सांग जहाला.

उत्सवलाभाचि साठिं बहुत कष्टला ॥
राजगुरु फ्रेजर तो मित्र जाहला ॥ उ० ॥ ध्रु० ॥
विद्या कला चटू सारे दानिं शोभला ॥
भूपबंधु बापुसाब असे जोडिला ॥
त्रेतायुगीं रामगुरु जेंवि ऐकिला ॥
तत्तुल्यचि सकल जनां स्पष्ट भासला ॥ १ ॥

पुनः गव्हरनर महाराजांस ह्मणतात.

॥ पद ॥ चा० अभाग्याचे घरीं बावा कामधेनु आली या चा० प्र०

फ्रेजरगुरुच्या शिक्षणाचा लभ्यांशचि जहाला ॥
उड्हौस एजंटअनूभव मित्रत्वें गमला ॥ फ्रे० ॥
नेत्रद्वारां सर्वहि अमुच्या पडलें दृष्टीला ॥
खचित पाहूं मुकुत्यारीच्याही, लवकर सुदिनाला ॥
दिनावधी ती दृष्टीं न पडे समजा वचनाला ॥ फ्रे० ॥ १ ॥

महाराज, आह्मांस आपल्याबद्दल जी माहिती आहे, त्यावरून आमची अशी खात्री होते—

॥ पद ॥ चा० ॥ नको हरि निशीं बाहिर.

मैत्री तुमची प्रीति तशीही आह्मांवर हें दिसे नयनीं ॥
ममत्वभाव तो किती आह्मांवरी, तुमचा दिसतो याच जनीं ॥ मै० १
आमुच्याविषयीं मतभावचि तो पूज्य नांदतो तुमच्या मनीं ॥
पौर्णीमेच्या शुभ्र इंदुसम स्वच्छ भासतो पाहूनी ॥ मै० ॥ २ ॥
अंगीं तुमच्या गुण असति ते ॥ न्यूनपणातें पावोनी ॥
दृष्टिस नच कधीं पडती अमुच्या ॥ वाटे विश्वास ध्यानिं मनीं ॥ मै०
राज्यसूत्र तें करीं घेउनी शकट हकाल जायिं रमुनी ॥
प्रजा तुह्मांवरी ममत्व ठेवुनी ॥ राहिल लक्षची अर्पूनी ॥ मै० ॥ ४ ॥
मातापितरीं प्रेम ठेविती ॥ बालक जेंवी अनुदीनीं ॥
तेंवि प्रजाही तुमची सारी ॥ वागेल निश्चित वाटे मनीं ॥ मै० ॥ ५ ॥

हें वर्तमान ऐकतांच कोल्हापुरांत सरकारवाड्यांतील लोक नाचूं लागले ( आनंदाच्या भरांत ); व शर्करा वांटली.

॥ पद ॥ राग ललितगौरी. ता० धुमा० ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला.

आनंदकारक वृत्त ऐकतां जगदंबे प्रार्थिती ॥
शर्करा मग आणुनि वांटिती ॥
प्रासादांतिल जन सारेही, आनंदें भक्षिती ॥
याचे विजयातें इच्छिती ॥
पानसुपारी हार तुरेही, सकलांना अर्पिती ॥
अत्तरा गुलाबा ओपिती ॥ चा० ॥
आनंदभरांतचि उड्या, मारिती ॥
मनि प्रेम धरुनि नृत्या, बाहिती ॥
वरि हस्त करुनि टाळ्या, पीटिती ॥ चा० ॥
ऐशा छंदें आनंद करुनी कुलदेवा विनविती
आनंदें शर्करा वांटिती ॥ १ ॥

---

# भाग दुसरा.

## मुहूर्ताचा निश्चय.

॥ आर्या ॥

ज्योतिषि पंडित शास्त्री निर्णय करुनी मुहूर्त काढीती ॥
वस्त्रप्राशीसाठीं रायातें सौख्य फार वानीती ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

फाल्गून वद्य एकादशी ॥
अठराशें पंधरा शकासी ॥
तारीख दोन एप्रिल त्या दिवशीं ॥
सन अठराशें चवऱ्याण्णव नेमिला ॥ १ ॥
सायंकाळींच मुहूर्त नेमिला ॥

विद्वज्जनांनीं पसंत केला ॥
सर्वांनीं आनंद मानिला ॥
भूपतिउत्सवाप्रीत्यर्थ ॥ २ ॥

मुक्त्यारीचे संबंधानें तयारी.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

आनंदोत्सव करण्यासाठीं, जिकडे तिकडे झटती ॥
सारे जन ते लक्ष देउनी निश्चितकार्यां रमती ॥ १ ॥

॥ आर्या ॥

नूतन प्रासादीं या उत्सवनिश्चय असेच जो ठरला ॥
ह्मणुनी जनचि सुशोभित मंडपसिद्धी करावया रमला ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

मंडपासी उत्तर दक्षिण द्वारें असती ॥
जीं तावदानांनीं सुशोभित दिसतीं ॥
त्यांवरील भिंगांतून रम्य चित्रें दिसती ॥
शौर्यदर्शक शिवाजीचीं ॥ १ ॥

( शककर्ता. )

॥ दिंडी ॥ राग लीलांवरी ता० दा०

सभामंडपिं या दिव्य शोभताती ॥
स्तंभविद्युद्दिप भव्य दीसताती ॥
मंडपाच्या बाहेरही असुनी ॥
सिद्ध करिती उत्साह ये ह्मणूनी ॥ १ ॥

नूतन प्रासादास कशी शोभा उत्तम प्रकारची आणली आहे पहा; पुढील भागीं पताकांनीं शुशोभित केलें आहे.

॥ पद ॥ चा०॥ तट जिचें वहु तें रम्य वृक्ष शेजारीं ॥ वनिं पसरे छाया सारी.

मंदिरीं रम्य किती स्तंभ असति शेजारीं ॥
कशि शोभा दिसते सारी ॥ चा० ॥
किति निशाणें ऊभारिती ॥ प्रांत तो बहुत शोभविती ॥
कांचदीपस्तंभावरती ठेविती भारी॥कशि शोभा दिसते सारी ॥१॥

दक्षिण आणि पूर्व या दोन्ही द्वारांनजीक सुरेख कृत्रिम द्वारें दोन केलीं होतीं.

राग देस ॥ पद ॥ चा० ॥ नको हरि निशिं बाहिर.

दक्षिण पूर्व द्वयद्वारांच्या, शेजारीं कशि निर्मियलीं ॥
कृत्रिम रम्य मनोहर द्वारें, दोन्ही नयनीं देखियलीं ॥ ध्रु० ॥
येथुनि बव्हाकृती स्तंभही, करविरसीमा जिथें दिसली ॥
तेथपावेतों उभे करूनी, दीपास्तव तजविज केली ॥ द० ॥ १ ॥
जयंतीवर द्वार होत जें, त्याची कृत्रिमता गणिली ॥
यासम कोठें न दिसे द्वारही, ज्यातें बघतां भुलि पडली ॥ प० ॥ २ ॥

॥ ओवी ॥ राग—मल्हार.

दीपोत्साहासाठीं ॥ तेथून टाउनहालापर्यंत मोठी ॥
व्यवस्थेची करूनि कोटी ॥ पंथद्वय मार्ग शोभविले ॥ १ ॥
न्यायाधीश कोर्टाच्या शेजारीं ॥ उदकाचा हौद असे सामोरीं ॥
त्यावर दीपांच्या अंबारी ॥ करूनि सुशोभित ठेविती ॥ २ ॥

टाऊनहालच्या इमारतीवर, तसेच बागेंत दीप ठेवण्याची उत्तम सोय केली होती.

॥ पद ॥ राग ललितगौरी ताल धुमाळी ॥ चा० भला जन्म हा तुला लाधला ॥

टाउनहालच्या इमारतीवर, उद्यानींही तशी ॥ तयारी पाहुनि प्रेमा मशीं ॥ राजपथाच्या द्वय बाजूंला, निशाणांची जशी ॥
आणिली शोभा वर्णूं कशी ॥ नगारखान्यावर दीपोत्सवही ॥
आणूनी मानसीं करावी मसलत ही फारशी[१] ॥ १ ॥

नामदार आदिकरून गोरे लोक येणार त्यांचे भोजनाबद्दल दर एक पात्रास ३० तीस रुपयेप्रमाणें मक्ता दिला होता.

---

१ फारशी—हा शब्द द्वयर्थी लागतो. ही मसलत मे० दिवाणसाहेब यांनीं काढिली असाही अर्थ होतो.

॥ आर्या ॥

प्रति पात्रीं मूल्यचि तें, दशत्रयांचेंचि मान ठरलें हो ॥
मक्त्यानें जें दिधलें कीर्ती त्याची अखंड जनिं राहो ॥ ३ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

गौरकायांच्या स्वागतास्तव अधिकारी जो साजे ॥
इन्फंट्रीचा कम्यांडिंग् हें नाम जयाचें गाजे ॥ १ ॥

दक्षिण महाराष्ट्रांतील सर्व संस्थानिक येणार त्यांस उतरण्यास स्थळें.

॥ पद ॥ चा० ॥ राग ललितगौरी ता० धुमा०

॥ चा० ॥ चराचरीं गुरु तरावयाला.

कागल्कराच्या बंगल्यामाजीं मुधोळ्कर राहती ॥ सांग्लिकरां श्रीबागें ठेविती ॥ मिराबागेमधिं जमखिंडीचे अधिपती राहती ॥ मिरजकरां खाराळ्याची स्थिती ॥ मळेकर रामदुर्गकरांना जागाही असती ॥ कसे ते स्वस्थानीं उतरती ॥ कुरुंद्वाडकर त्रिवर्ग सारे गंगातिरीं ठेवती ॥ स्थळांची लाविली ऐशी रिती ॥ १ ॥

संस्थानिक व जहागीरदार निमंत्रणाप्रमाणें समारंभास येऊं लागतात.

॥ श्लोक ॥ वसंततिलका वृ०

समारंभशोभा करायासि जेव्हां ॥
निमंत्रूनि भूपें यथाकाळिं तेव्हां ॥
कुरुंद्वाडग्रामाधिकाऱ्यांसि आणी ॥
तया तुल्य दूजे किती सांगु वाणीं ॥ १ ॥

मुधोळकर घोरपडे.

॥ पद ॥ राग शंकराभरण ता० धुमाळी.

॥ चा० ॥ अभाग्याचे घरीं बाबा कामधेनू आली.

राजेसाबाची स्वारी जेव्हां थाटानें आली ॥
आप्तातें निरखुनी भारी सन्मानें आणीली राजे सा० ॥ ध्रु० ॥

---

१ मुख्य मुख्य आले त्यांचीं नांवें लिहिलीं आहेत.

पूर्व पुण्याईच्या भाग्यें संपदा ती आली ॥ धनलोभ्यांची ज्याचे ठायीं प्रीति राहीली ॥ ऐशी मूर्ती हयरथवहानीं दृष्टीं देखीली ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

संस्थानिक मनोहर ॥ धुंडिरायचिंतामण सांगलीकर ॥
बेंडवाद्यासह सुस्वर ॥ आनंदें येत थाटानें ॥ १ ॥

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमा०
॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला.

जमखिंडीकर ज्याचा बाणा शूर समूहामधीं ॥ शोभतो धैर्याचा ऊदधी ॥ शुभ्र वस्त्र स्वांगींच लेउनी, इतरांच्या तो आधीं ॥ पातला करविर क्षेत्रामधीं ॥ सुंदर वाजी अश्वस्वारही घेउनियां बरोबरी ॥ येतसे वाद्यांच्या गजरीं ॥ चा० ॥ बाहुटे असुनि तो अश्वभार शोभतो ॥ त्यामागें हयरथीं भव्य जनां दीसतो ॥ दृष्टिला भीष्म जणुं गांगेयचि भासतो ॥ चा० ॥ बलवंताला वर्णन करण्या कांहिं नसे आवधी ॥ शोभतो धैर्याचा ऊदधी ॥ २ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दा०

मीरजेचा अधिकारि जिथें आला ॥
वाद्यघोषांचा गजर तिथें झाला ॥
वाजि तेजी पादाति असुनि भारी ॥
रम्य शोभा ती न वर्णवे सारी ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

मळेकर कारभारी घेऊनि समवेत ॥ उत्सहालागीं प्राप्त होत ॥
ज्यातें देखुनी जन समस्त ॥ आनंदातें पावती ॥ १ ॥

॥ पद ॥ राग शंकरा भरणा ता० झंपा प्रबंध.
॥ चा० ॥ नमोभक्तसुर तरुलते.

काय कथुं नवल तें आपणाचि भोगितो ॥ बापुसाबासह

भूपती हा ॥ काय क० ॥ ध्रु० ॥ स्वजनसमुदायिं नृप भरंवसा ठेवितो ॥ रामवाणीं जसा बंधु त्याचा ॥ किती शूर हा ॥ मान्य हा निकट साचा ॥ १ ॥ सकल जन देखुनी प्रेम त्या मानुनी ॥ उत्सवाही असे जवळ साचा ॥ २ ॥

॥ अंजनीगीत ॥ राग झिंजोटी. ता० धुमा०

इचलकरंजिकर संस्थानांतुनी ॥ समारंभालागि निघोनी ॥
स्वकिय जनांतें संगें घेउनी ॥ उत्साहें आले ॥ १ ॥
निशाणधारी स्वार दीसती ॥ हयरथवाहनीं श्रेष्ठ शोभती ॥
प्रायव्हेट सेक्रेटरिसह येती ॥ शोभा किति वर्णूं ॥ २ ॥

॥ पद ॥ राग देसकार ता० धुमा०

॥ चा० ॥ भूपाळीचे चालीवर.

पंतअमात्यचि बावडेकर हे देखुनि सुख वाटे ॥ आनंदकारक मूर्ति विलोकुनी कंठचि मम दाटे ॥ विलोकुनि० ॥ कर्णबल्लीसम औदार्याचा कुंभ जिथें सांठे ॥ दया असुनिही शांतिस्थळ तें रम्यचि हें मोठें ॥ दसऱ्यादिवशीं अंबारीमधिं प्रेम धरूनि नेटें ॥ बैसे जेव्हां नृपतीसंगें भानूसम वाटे ॥ छत्रपतीसहि सुमंत संगें अशि शोभा कोठें ॥ दृष्टिस नच पडते, खचीतचि न वदावें खोटें ॥ अश्वस्वार ते मागें असूनी हयरथिं अति थाटें ॥ आले देखुनी उत्साहासी आनंद बहु लोटे ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

रामदुर्गचे श्रेष्ठ तेही, मुक्त्यारीला येती ॥
मंत्रिजनांसह उत्साहातें, पाहुनि तेथें रमती ॥
ह्मणती धन्य खरा ॥ भूपासम न गमे दुसरा ॥ १ ॥

॥ पद ॥ राग देसकार ता० धुमाळी.

पंतप्रतिनिधि विशाळगडकर दिसती दृष्टीला ॥ पाहुनि तेव्हां आनंद वाटे सर्वा लोकांला ॥ चहूंकडे वाद्यांचा नुसता

घोषचि जो दिसला ॥ शब्दमात्रें नभमंडळीं नादचि दुमदुमला ॥ सर्व नद्या उत्साहें मिळती जेंवि सागराला ॥ भासे जणुं मज संस्थानिक हे भेटति शाहूला ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

बाळासाहेब घाटगे त्याच समयीं ॥
कागलाहुनि पातला समुदायीं ॥
नातें ज्याचें भूपतिसि केंवि साजे ॥
जनक ताताचा बंधु कीर्ति गाजे ॥ १ ॥

ता० १ ए० रोजीं ठरल्याप्रमाणें—सकाळीं इंग्रजी १० वाजतां ना० गव्हरनर पत्नीसह व परिवारासह येऊन दाखल झाले.

॥ पद ॥ चा० ॥ सुटला पितृदिशेचा वारा.

ठरला नेमचि त्या अनुसरुनी ॥ तारिख एकचि त्या पाहूनी ॥ भरली गर्दिनें बहु मंडळी सेक्रेटरी प्रमुख जी दिसली ॥ गव्हरनर पत्नीसह येउनी ॥ देखिला नयनीं ॥ १ ॥

गव्हरनरास स्टेशनावर लोक सामोरे जातात.

॥ साकी ॥ राग–जोगी ता० धुमाळी.

कर्नल हंटर वॉल्श असिस्टन, आणि गौर किति येती ॥
स्टेशनस्थानीं सर्वहि येउनी स्वागतउत्सव करिती ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

नामदाराच्या आगमनासाठीं ॥
होत स्टेशनीं विपुल जिथें दाटी ॥
मेहेर्जि दीवाणहि येइ त्या स्थळाला ॥
कामदारांसह स्वागतोत्सवाला ॥ १ ॥

॥ आर्या ॥

स्टेशनसन्निध सुंदर पटांगणामाजि बैठका करिती ॥
देखुनि मुदितचि होती प्रेक्षक जन जे पहावया जमती ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

सर्वत्रांच्या भेटि घेउनी, नामदार मग निघती ॥
चतुरश्वांच्या, रथीं बैसुनी रेसिडेन्सीच्या जाती ॥
सुंदर बंगल्याला ॥ भुलती जन पाहुनि ज्याला ॥ १ ॥

गव्हरनराकडील अंडर सेक्रेटरी वगैरे श्रीम० महाराज यांस बोलावण्याकरितां आले.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

एडिक्यांप आणि अंडर सेक्रेटरी ॥ अहर्निश नामदारांच्या शेजारीं ॥
असती ते पाचारणार्थ राजमंदिरीं ॥ प्राप्त झाले कौतुकें ॥ १ ॥

निमंत्रणाप्रमाणें महाराजांची स्वारी निघाली.

॥ पद ॥ राग भीमपलासी ता० धुमाळी चा० गव्यांनो कृष्ण गडी आपुला.

मग ती छत्रपति स्वारी ॥ निघाली आनंदें भारी ॥ कोन्सिलर घेउनि बरोबरी ॥ पातली बंगल्या रहदारी ॥ सरदार असती शेजारीं ॥ शोभा किती वर्णू सारी ॥ चा० भेटते झाले मग ऐसे ॥ जगांतचि सार्वभौम कैसे ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ द्रुतविलंबित वृ०

मग परस्पर वृत्त विचारिती ॥
कुशल ज्यांतचि अर्थहि भासती ॥
नृप तयीं गमनार्थचि शोभला ॥
प्रगट त्या दरबारिंच चालिला ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

भेटीस गमनागमनाचे वक्तीं ॥ प्रत्येक वेळीं सलामी देती ॥
तोफांची ती एकोन विंशती ॥ श्री छत्रपतीकारणें ॥ १ ॥

॥ आर्या ॥

या नंतर दक्षिणचे संस्थानिक सर्व भेटते झाले ॥
दश मिनिटावधि घेउनी अनुक्रमें ते पहा कसे आले ॥ १ ॥

ता० २ एप्रिल १८९४ फाल्गुन वद्य ११ रोज सोमवार संध्याकाळीं ९ वाजतां मुक्त्यारीचीं वस्त्रें होऊन लागलीच नव्या राजवाड्यांतील दरबारहॉलामध्यें दरबार भरेल, त्यास आपल्या रिवाजाप्रमाणें दरबारास पोषाक करून यावें; अशाबद्दल आगाऊ प्रसिद्धी केली होती ती—

॥ श्लोक ॥ शार्दूलविक्रीडित वृ०

ज्याच्या मस्तकिं शोभते पगडिही तो योग्य झाला असे ॥
फेट्यातें स्वशिरीं उगीच वरितो तो पात्र झाला नसे ॥
ऐशी मंडपिं येइ जो तव तया आज्ञाचि झाली खरी ॥
पूर्वापार अशी रिती घडतसे जी उक्त मान्या बरी ॥ १ ॥

ब्राह्मणभोजन खाशी पंगत, भोजनदक्षिणा, शिष्टसंभावना, यांजकडे अधिकारी कोण व कसे नेमिले ते—

॥ पद ॥ राग ललित ता० धुमाळी ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला ॥

ब्राह्मणभोजनिं श्रेष्ठ शोभती अधिकारी ते किती ॥ वर्णना मति स्फुरण पावती ॥ उत्तरभागच्या आफिसराला, मुख्य तिथें नेमिती ॥ सहाय्य लघु गुरू दीसती ॥ सिटिमाजिस्त्रेट आणि खजानिस ॥ इत्यादी शोभती ॥ पेठ्यांतुनि हेड्क्लार्क आणिती ॥१॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

खाशा पंक्तीकडे अधिकारी ॥ जो योग्य नेमिला विचारी ॥ ज्यातें ह्मणती खासगी कारभारी ॥ आणि पन्हाळा मामलेदारही असे ॥१॥
भोजनदक्षिणकडे ऑफीसर ॥ सर न्यायाधीश आणि दप्तरदार ॥ तैसेच जन ते पेन्शनर ॥ नेमिते झाले ऐकाहो ॥ २ ॥

॥ आर्या ॥

परांजपे प्रोफेसर, आणि असिस्टंट जज्ज हे असती ॥
राजोपाध्ये मगही ॥ शिष्टांच्या दक्षिणेप्रती झटती ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

ज्या ज्या समया सभा होत ॥ त्या त्या वेळीं व्यवस्था ठेवित ॥
असिस्टण सरसुभे शिरोळ मामलेदार सहित ॥ अति कौतुकें जाणपां १

जिकडे तिकडे कामाचे संबंधानें खासगी कारभाऱ्याचें काम वरचेवर पडत असे.

॥ पद ॥ चा० ॥ गड्यांनो कृष्ण गडी आ०

**जगाचा आवडता भारी ॥ असेचि खासगि कारभारी ॥ लक्ष्मणराय नामधारी ॥ वर्णिती प्रजा जया सारी ॥ कुशलता देखुनियां स्वारी ॥ ठेवी यासचि दरबारीं ॥ उत्सवीं लगबगिनें धांवे ॥ प्रेम तो मानसिं बहु पावे ॥ १ ॥**

श्रीमन्महाराज शाहु छत्रपति सिंहासनारूढ होणार त्याबद्दल समारंभाचा प्रोग्राम.

रविवार, तारीख १ एप्रिल सन १८९४ इ०

सकाळीं ८–२९ वाजतां नेक नामदार गव्हरनर साहेब बहादुर यांची स्वारी कोल्हापूर स्टेशनावर आगगाडींतून दाखल होईल. नेक नामदार साहेब यांचें आगमन "खासगी" प्रकारें होईल, ह्मणून तत्संबंधी कांहीं समारंभ होणार नाहीं. मेहेरबान पोलिटिकल एजंट साहेब बहादुर व त्यांचे असिस्टंट हे नेक नामदार गव्हरनर साहेब बहादुर यांस स्टेशनावर सामोरे जातील, तेथून नामदार साहेब रथांत बसून रेसिडेन्सी बंगल्यांत जातील, बरोबर लाल डगल्याचे रिसाल्याची पार्टी जाईल.

सोमवार ता० २ ए० सन १८९४ इ०

नेक नामदार यांचे आगमनसूचक १७ तोफांची सलामी सूर्योदयाचे वेळीं होईल.

सकाळचे ७॥ वाजतां कौन्सिलचे मेंबर, मुख्य सरदार, निमंत्रित आप्तांसह श्रीमन्महाराज छत्रपति साहेब यांची स्वारी रेसिडेन्सी बंगल्यांत नेक नामदार यांचे भेटीकरितां जाईल. ह्या समयीं होणाऱ्या समारंभाचा प्रोग्राम मुंबईसरकाराकडून अलाहिदा करण्यांत आला आहे.

करवीर राज्याचे गादीवर श्रीमन्महाराज छत्रपति साहेबांस आरूढ करण्यास्तव नेक नामदार गव्हरनर साहेब नवीन राजवाड्यांत सायंकाळचे

५ वाजतां दरबार भरवितील. ह्यासमयीं होणाऱ्या समारंभाबद्दल वेगळा प्रोग्राम मुंबईसरकारांनीं केलेला आहे. दरबारांत येणाऱ्या निमंत्रित मंडळींनीं ४–१५ वाजण्यापूर्वीं आपापल्या जागीं येऊन बसावें.

दरबार बरखास्त झाल्यावर श्रीमन्महाराज छत्रपतिसाहेब सरकार करवीर यांची स्वारी लवाजम्यासह श्रीअंबाबाईचे दर्शनास जाईल; या समयीं नवीन राजवाड्यापासून जुन्या राजवाड्यापावेतों रस्त्यावर व श्रीअंबाबाईचे देवालयापर्यंत रोशनाई करण्यांत येईल.

रात्रीं ९॥ वाजतां नेक नामदार गव्हरनर साहेब बहादुर व लेडी हॉरिस यांचे सन्मानार्थ मंडळी जमून भेटीचा समारंभ रेसिडेन्सी बंगल्यांत होईल.

मंगळवार, तारीख ३ ए० १८९४ इ०

सकाळीं ७–३० वाजतां नेक नामदार गव्हरनर साहेब बहादुर श्रीमन्महाराज छत्रपति साहेब यांचे परत भेटीकरितां नवीन राजवाड्यांत जातील; ह्या वेळीं जो समारंभ होण्याचा त्याजबद्दल मुंबईसरकारांनीं निराळा प्रोग्राम केलेला आहे, आणि याच वेळीं नेक नामदार लेडी हॉरिस मुलींच्या मुख्य शाळेंत शिवणकामाचें प्रदर्शन खुलें करतील.

सकाळीं ८–३० साडेआठ वाजतां शनिवार वेशीनजीक मानपत्रकमेटीकडून मंडप उभारला आहे; त्या ठिकाणीं करवीर इलाख्याचे प्रजेकडून व कोल्हापूर म्युनिसिपालिटीकडून मानपत्रें सादर होतील; त्याचा स्वीकार श्रीमन्महाराज छत्रपति साहेब करतील.

सकाळीं १० वाजतां खासबागेंत ब्राह्मणभोजन होईल. सायंकाळीं ३ वाजतां रिसाल्यांत व हत्तीमहालांत ब्राह्मणांस देकार वांटण्यांत येईल. रात्रीं ८–३० वाजतां टाऊनहॉलांत नेक नामदार गव्हरनर साहेब बहादुर यांचे सन्मानार्थ करवीरसरकाराकडून मेजवानी देण्यांत येईल. या प्रसंगीं जितीच्या ओढ्यापासून टाउनहॉलपर्यंत रस्त्यावर व टाउनहॉलचे इमारतींत व बागेंत रोशनाई करण्यांत येईल.

रात्रीं १०–३० वाजतां पंचगंगानदीचे घांटावर दारूकाम उड-विण्यांत येईल.

बुधवार, ता० ४ एप्रिल १८९४ इ०

सकाळीं ९ वाजतां करवीर इलाख्यांतील जहागीरदारांकडून जुन्या राजवाड्यांत श्रीमन्महाराज छत्रपतिसाहेब सरकार करवीर यांस मान-पत्र देण्यांत येईल.

सायंकाळीं ३ वाजतां जुन्या राजवाड्यांत निमंत्रण केलेल्या गृह-स्थांचे भेटीकरितां दरबार होईल. व या दरबारांत खालीं लिहिलेल्या सभांकडून आलेल्या मानपत्रांचा स्वीकार करतील.

१ पुणें सार्वजनिक सभा.

२ इंडस्ट्रियल असोसियेशन.

३ डेकन एज्युकेशनल सोसायटी.

४ डेकन असोसियेशन.

५ रोमन क्याथोलिक कम्युनिटी, कोल्हापूर.

६ नाइटक्लब पुणें, इत्यादि, इत्यादि.

रात्रीं ९–३० वाजतां नवीन राजवाड्यांत साहेबलोकांचा बॉल होईल.

गुरुवार, तारीख ५ माहे एप्रिल सन १८९४ इसवी.

सकाळीं १० वाजतां जुन्या राजवाड्यांत मराठेमंडळीची पंगत होईल.

सायंकाळीं ४–४५ वाजतां नेक नामदार गव्हरनर साहेब बहादुर यांचे स्वारीचा कूच होईल. या समयास समारंभ होण्याचा त्याजबद्दल वेगळा प्रोग्राम करण्यांत आला आहे.

शुक्रवार, तारीख ६ माहे एप्रिल सन १८९४ इ०

कुस्त्या होतील. शाळांतील मुलांस खाऊ वांटण्याचा समारंभ होईल.

---

# भाग तिसरा.

## मुक्त्यारीसमारंभ व त्यासंबंधी दरबार.

ता० २ एप्रिल १८९४ सोमवार.

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

गुढ्या द्वारीं सर्वही उभारीती ॥
तोरणांतें बांधिती याच रीतीं ॥
नगर सारें मिष्टान्न सेवुनीयां ॥
अलंकारांनीं भूषविती काया ॥ १ ॥

॥ पद ॥ राग झिंजोटी ता० त्रिवट. ॥ चाल ॥ शैवालें युक्त जैसें पंकज तें शोभतें.

नगरासी शोभा आली, बहु रम्य दीसलें ॥ जैसी कां अमरपूरी, तैसेंच भासलें ॥ नारींना योग्यकाळीं बघण्याला फावलें ॥ बलवंता धैर्य आलें, वर्णाया शोभलें ॥ १ ॥

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमाळी.

॥ चाल ॥ भला जन्म हा तुला लाधला.

रस्तोरस्तीं हयरथ क्रमिती टांगे तेही तसे ॥ वर्णना मतिही साग्र नसे ॥ रम्यवाहनें सुंदर वाजी यांची शोभा दिसे ॥ मानसा उल्हास होतसे ॥ चा० ॥ जनकदंब भारी दिसला, निरखुनी ॥ मति स्तब्धचि माझी जहाली, वर्णनीं ॥ संख्येची नाहीं परिमिती, शोधुनी ॥ पहातां गर्दि उडाली, रीघही जाया नसे ॥ देखुनी आलें नृपाला हसें ॥ रस्तोर० ॥ १ ॥

श्री० महाराज छत्रपति यांस वस्त्रें मिळणार ह्मणून कितीएक कोल्हापूरच्या श्रीमंत लोकांनीं आनंदानें कांहीं मुलांस मिठाई वांटली.

॥ पद ॥ राग आनंदभैरवी. ॥ चा० ॥ काय पला भूल पडली.

काय सांगुं मिठायीची गर्दि उसळली ॥ तें सुख किति बोलुं

परी, मति गुंगली ॥ काय सां० ॥ ध्रु० ॥ पेढे बर्फीमधें मुलें तेव्हां रंगलीं ॥ इक्षुरसें कदलिफळें तृप्त जहालीं ॥ जयघोषा मुखीं वदत गृहीं पातलीं ॥ काय सां० ॥ १ ॥

याच दिवशीं ह्मणजे ता० २ एप्रिल १८९४ रोजीं प्रांतांतील सर्व शाळांत मिठाई सरकारांतून मुलांचे संख्येच्या मानाप्रमाणें वांटली.

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमाळी.

॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला.

प्रांतांतिलही शाळांमध्यें मिठाई वांटती ॥ आनंदें विद्यार्थी डोलती । करकमळीं ते पुडे घेउनी, रमत रमत जाती ॥ नृपाचे जयघोषा बोलती ॥ मातापितरें वदना निरखुनी, आनंदा मानिती ॥ नृपाचे कल्याणा चिंतिती ॥ १ ॥

॥ आर्या ॥

खेड्यापाड्यांमध्यें, उत्साहा योग्य करिति जन सर्व ॥
सर्वत्रांनीं वरिलें, आनंदाचेंचि हें महा पर्व ॥ १ ॥

शहरांत जिकडेतिकडे आनंदीआनंद दिसूं लागतांच शहरांतील स्त्रीपुरुष श्रीजगदंबेची प्रार्थना करूं लागतात.

॥ पद ॥ चा० ॥ बलसागर तुह्मी वीरशिरो० कोठें तरि रमलां ॥

करविरवासी, नारीनर ते, आशीर्वच देती ॥ नृपाला आशि० ॥ नम्र होउनी जगदंबेला हेंची प्रार्थीती ॥ अंबेला हेंची प्रा० ॥ त्रिपुरसुंदरी अंबे भवानी, ऐसें बाहीती ॥ भवानी ऐसें बा० ॥ दीर्घायू हो आमुचा भूपति, ऐसें विनवीती ॥ अंबेला ऐसें वि० ॥ १ ॥

दूरदूरच्या ठिकाणांहून सर्व लोक आलेले पाहून माझे चित्तास फार आनंद झाला.

॥ पद ॥ चा० ॥ उठी गोपालजी जाइं धेनूकडे. झंपा–प्रबंध ॥

लोक येती तदा दुरुनी कौतुकें तोषती नेत्र ते देखुनीयां ॥

लोक० ॥ ध्रु० ॥ अष्टदीना सुटी साधुनी संधि ही ॥ गर्दिनें नगर तें भव्य शोभे ॥ लो० ॥ नृपतिचे यशधना, निरखुनी कामना ॥ जाहली वासना ॥ पूर्ण माझी ॥ लोक० ॥ १ ॥

तालुक्यांतून सर्व मामलेदार आदिकरून मंडळी आणून त्यांस कामें नेमिलीं.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

तालुक्यांचे मामलेदार ॥ आणवून तत्काळ साचार ॥
एजंटमुखें सुखकर ॥ सर्व आज्ञा वंदिती ॥ १ ॥

मुधोळकर घोरपडे, सांगलीकर आदिकरून पूर्वीं आलेली मंडळी दरबारास चालती होते.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

नागोजिराव पाटणकर ॥ तसेच चव्हाण हिंमतबहादुर ॥
भूपतीचे आप्त सरलष्कर ॥ दरबाराला प्रवेशती ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

किती सरदार दरबारास येती ॥
वदनिं गातां मम मती न स्फुरे ती ॥
लहानथोरांचीं नामें वर्णितांना ॥
ग्रंथ वाढेल असो काव्यरचना ॥ १ ॥

*सार्वजनिकसभेकडून प्रमुख मंडळी आलेली दरबारास येते.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

भिडे कीर्तने आदिकरूनी दरबारीं किति येती ॥
विद्वज्जनांची गणती करितां, मम मति कैशी थकती ॥ १ ॥

डेक्कन एज्युकेशन सोसायटीकडील आलेली मंडळी.

मे० रामकृष्ण गोपाळ भांडारकर वगैरे.

---

* शेवटीं 'सकलजनांस प्रार्थना' या सदराखालीं लिहिलेली कविता कृपा करून वाचावी.

॥ श्लोक ॥ शार्दूलविक्रीडित वृ० ॥

विद्वद्रत्न कसें सुशोभित दिसे शांतीच वस्ती असे ॥
गर्वाचा लवमात्र लेशचि कसा ज्याचे ठिकाणीं नसे ॥
गीर्वाणीं बहु रामकृष्ण गमला भांडारवाडा जनां ॥
येई तो नृप उत्सहार्थ बघुनी आनंद वाटे मना ॥ १ ॥

( आगरकर ) ॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दा०

निस्पृहांतचि जो शिरोमणी साजे ॥
टीळकाचा जो परम मित्र गाजे ॥
देह कष्टविला जगासाठिं ज्यानें ॥
उत्सवासी पातला आनंदानें ॥ १ ॥

महाराजांचे ट्यूटर. ॥ पद ॥ चा० ॥ सूर्यवंशीं रामराय जा०

रघुनाथरायटयूटर ही येइ त्या स्थळा ॥ विद्वज्जनीं मुकुटमणी, तेविं शोभला ॥ गुणवंतांमधिंच तया स्पष्ट वर्णिला ॥ टयूटरचि सदय कसा नृपा लाभला ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ चामरवृत्त.

विश्वनाथ, राय काय, भासतो, महागुणी ॥
गोखले असेच ऊपनांव शोभतें जनीं ॥
वानिती जयास पंडितासमान हें खरें ॥
येइ जो सभेमधीं मनास वाटलें बरें ॥ १ ॥

॥ कटाव ॥

किती आफीसर सभेंत येती ॥ नामें त्यांचीं वर्णुं मी कीती ॥ फारेस्टाचे जे अधिपति ॥ लगबग समारंभा येती ॥ ठकार दप्तरदारही येती ॥ जो दरबारीं निःपक्षपाती ॥ ऐसा क्वचितचि लाभे जगतीं ॥ विद्याखात्याचा अधिपती ॥ विठ्ठल खंडेराव ह्मणती ॥ उपनामासम ज्याची कीर्ती ॥ गाजे धन्यचि या महिवरती ॥ सरळ मनाचा

निस्पृह ह्मणती ॥ शाहुजनक ताताची प्रीती ॥ असें ह्मणुनि इंग्लंदा नेती ॥ विश्वासुक नोकर जे असती त्यांमधिं ज्याला श्रेष्ठ मानिती ॥ त्याच्या गुणां जे जे पहाती ॥ ते ते सर्वहि प्रेमा करिती ॥ रीव्हूज एजंटें विश्वासाला ॥ पाहुनि ज्याच्या श्रेष्ठचि केला ॥ विद्याखात्याच्या कामाला ॥ इंग्लंदाच्या पद्धतीला ॥ देखिलें होतें ह्मणुनि तयाला ॥ पाहुणचाराच्या कामाला ॥ मसलत करुनी योग्य नेमिला ॥ उत्साहाला तोंहि पातला ॥ प्रोफेसर मोडकही आला ॥ ज्याचा झेंडा दृष्टी पडला ॥ रसायनामधीं बहुत शोभला ॥ जगतासाठीं ग्रंथ निर्मिला ॥ ऐसे विद्वज्जन किति येती ॥ वर्णूं कुठवरती ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

मेहेरजी भाई दिवाण असती श्रेष्ठ समारंभांत ॥
चीफ् जज्ज बलवंतरायसह सरसूभेही त्यांत ॥
सांग उत्साहा ॥ करिती त्रिवर्ग खासा पहा ॥ १ ॥

॥ पद ॥ चाल ॥ नको हरि निशिं बाहेर जाऊं.

कूवरजीचा तनय मेहेरजी, गहन विचाराची मूर्ती ॥ आधीं करविरीं चीफ् जज्जही, होउनी वाढविली कीर्ति ॥ कू० ॥ १ ॥ ध्रु० न्यायगुणाच्या कौशल्यानें मंत्रिपणाची मग प्राप्ती ॥ होउनी कैसा भव्यचि शोभे, गुणमंडित या महिवरती ॥ कू० ॥ २ ॥ छत्रपतीच्या दत्तविधानीं ॥ रीजंटाची बहु प्रीती ॥ तैशि मिळविली एजंटाची ॥ संपादुनियां सत्कीर्ती ॥ कूव० ॥ ३ ॥ भूपतीच्याही विवाहकालीं ॥ झटुनि प्रीतीनें कशि जगतीं ॥ सुसूत्रतेनें विद्यावांचुनी केली ज्यानें बहु ख्याती ॥ कूव० ॥४॥ मुक्त्यारीच्या उत्सवसमयीं ॥ श्रमला जेविं मथुरापती ॥ राजसूय यज्ञांत धर्मगृहीं भासे कविला तेविं स्थिती ॥ कू० ॥ ५ ॥

॥ साकी ॥ राग–जोगी ता० धुमाळी.

मेहेरजी भाई परम दयाळु, मंत्री श्रेष्ठचि साजे ॥
उत्साहा करी अति युक्तीनें, कीर्ति जयांची गाजे ॥
ऐसा थोर वरा ॥ न मिळे यासमही दुसरा ॥ १ ॥

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमा०

॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला.

चीफ् जज्ज बलवंतराय जो योग्यचि न्यायासनीं ॥ देखिला नच दूजा नयनीं ॥ दया असुनि निस्पृहता वसते, भारी ज्याच्या मनीं ॥ न करी पक्षपात या जनीं ॥ नृपउत्साहीं विपुल श्रमातें, प्रेमातें मानुनी ॥ केलें मनोभावापासुनी ॥ चा० ॥ नृपजनकताताचा ट्यूटर जो जाहला ॥ अल्पकाळ ज्यानें विद्याक्रम पढविला ॥ तैं पासुनि स्नेहातें पान्हा फुटला ॥ चा० ॥ भूपासाठीं नीतिपथाच्या बैसुनि सिंहासनीं ॥ कष्टला उत्साहालागुनी ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० ॥ नच सुंदरि करुं कोपा । मजवरि धरि अनुकंपा ॥ या चा० प्रमाणें.

वैद्यचि हा सरसूभे ॥ बहुगुणां ज्या लाभे ॥ कीर्तीचा ध्वज ज्याचा ॥ भूवरि या शोभे ॥ वै० ॥ करुणेचा सागरची ॥ शांतीनें भरलाची ॥ वंदिति जन मूर्तीला ॥ कर जोडुनी लोभें ॥ वैद्य० ॥ १ ॥ उत्सविं या बहु श्रमला ॥ ह्मणुनी प्रेमा जडला ॥ नृप मानी बहु ज्याला ॥ अधिकारानें सजला ॥ वर्णावें यश जैसें ॥ कदलीचे गाभे ॥ वैद्यचि० ॥ २ ॥

दरबारहॉलाचे ठिकाणीं राणीसाहेब (सर्व) बसल्या असून पडद्याच्या योगानें कशी शोभा आली पहा.

॥ पद ॥ चा० ॥ चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावर हरी ॥

राग ललित ता० धुमाळी.

अरुणासम त्या गहन चमकती, प्रभा शोभे पींवळीं ॥ पटांची चित्रविचित्रावळी ॥ लघु जाळ्यांचीं द्वारें असति त्या भरजरि

वस्त्रावरी ॥ त्रिभुवनीं न दिसे ज्याची सरी ॥ अहिल्या प्रमुख त्या राज्ञि सर्वही, बैसुनि ग्यालरिवरी ॥ उत्सहा बघती डोळे-भरी ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ वसंततिलका वृ०

आधींच मंडप बहूतचि शोभिवंत ॥
शास्त्री गुणज्ञ किति बैसति बुद्धिवंत ॥
विद्वान पंडित तसे किति येति तेथें ॥
शोभेच ग्यालरि पटें मति नाहीं जेथें ॥ १ ॥

इतक्यांत गव्हरनर साहेबांची स्वारी आपल्या परिवारासह दरबारा-मध्यें प्रवेश करिते.

॥ पद ॥ राग सिंध ता० दीपचंदी. ॥ चाल ॥ इस तन धनकी कोन बढाई ॥ देखत नयनोमें मट्टी मिलाई.

सुखवि नयन किति, ही मुक्त्यारी ॥ शोभा नयनीं, देखती सारी ॥ सु० ॥ ध्रु० ॥ वसंतसन्मुखिं, राज्ञीवचनें, हॅरिस लार्ड आला दरबारीं ॥ सु० ॥ १ ॥ आणिक गौर, वर्ण देखुनी ॥ झालों चकित, या संसारीं ॥ सु० ॥

नामदार गव्हरनर साहेब हे श्री० महाराज यांसमवेत ९ वाजतां दरबारच्या दिवाणखान्यांत आले, त्या वेळीं खडीताजीम मिळाली. नंतर राजासनाच्या समीपच्या खुर्च्यांवर उजवेकडे श्री० महाराज, व डावीकडे नामदार साहेब व इतर मंडळी आपापल्या जागीं विराजमान झाल्यावर नामदार साहेबांनीं प्रसंगयोग्य असें संभाषण करण्यास प्रारंभ केला, त्याचें मराठी भाषान्तर, त्यांचे पो० सेक्रेटरी ना० व्हटवर्थ साहेब यांनीं सांगितलें, तें पुढें लिहिल्याप्रमाणें:—

राजेसाहेब, शिवाजीराजे ज्यांचें नांव इतिहासांत अमर होऊन राहिलें आहे, यांजपासून ही गादी आपल्या पूर्वजांस व आपल्यास प्राप्त झाली आहे. या गादीवर सार्वभौम सरकारानें आपली योजना केली

त्या वेळीं कोल्हापूर येथील लोकांस जें अभिवचन देण्यांत आलें होतें, तें खरें करून दाखविण्याचा समय, मुंबईइलाख्याचा गव्हरनर मी असतांना आला, ह्मणून मी आपल्यास धन्य समजतों.

राजेसाहेब, आपल्या घराण्यावर गेल्या तीस वर्षांच्या अवकाशांत जीं संकटें येऊन पडलीं त्यांचा विचार केला असतां, त्या गादीचे हक्कदार वारस गादीवर कधीं बसतात व आपल्यास योग्य वाटेल अशी व्यवस्था करून या संस्थानाचा कारभार चालविण्यास कधीं सुरवात करितात, हें पहाण्याविषयीं या संस्थानांतील लोक उत्सुक किंवा उतावीळ झाले असतील हें मी पूर्णपणें जाणत आहें.

तो सुदिन त्यांस आज प्राप्त झाला असून आणखी आपल्यासारखा सत्वस्थ व सुशील राजा त्यांस मिळाला, ही विशेष समाधानाची गोष्ट आहे.

या समयीं, मागील राजेसाहेबांच्या अकालीं व शोचनीय मरणानंतर सार्वभौम सरकारानें आपली या गादीवर योजना केली त्या वेळेपासून आजतागायत कोल्हापूर संस्थानाच्या संबंधानें ज्या मुख्य मुख्य गोष्टी घडून आल्या, त्यांपैकीं कांहीं थोडक्यांत येथें सांगितल्यास अप्रासंगिक होणार नाहीं.

असत् पन्हाराणीसाहेबांनीं आपल्यास दत्तक घेतलें त्या वेळीं, दत्तविधानाचा समारंभ योग्य थाटमाटानें प्रसिद्ध रीतीनें करण्यांत आला. आणि त्या प्रसंगीं कोल्हापूर संस्थानाकडून नजराणा घेण्याचा आपला हक्क इंग्रज सरकारानें अमलांत आणला नाहीं. तसेंच आपल्यास जें राज्यपद मिळावयाचें, त्यासंबंधाचीं कर्तव्यें चालविण्याची आपल्या ठिकाणीं योग्यता यावी, व आपल्या घरावर असणाऱ्या मोठ्या जबाबदारीचें (ह्मणजे महाराणी सरकाराविषयीं एकनिष्ठ भक्ति व सार्वभौम सरकाराशीं असावयाचा आपला संबंध ठरविणारे करारनामे, तहनामे, व सनदा हीं इमानानें पाळणें या गोष्टींचें) आपल्यास खरें महत्व

समजावें याकरितां, आपल्यास देतां येईल तेवढें उत्तम शिक्षण देण्याविषयीं एकदम व्यवस्था करण्यांत आली. ह्या कामीं फ्रेजरसाहेबासारखे गृहस्थ आपल्यास केवळ शिक्षकच नव्हत, तर मित्र व सोबती मिळाले, हें एक आपलें सुदैवच समजावयाचें, ही गोष्ट आपण कबूल कराल. सदरहू नामांकित खात्यामधील इतर कामदारांप्रमाणें, या साहेबांचेंही हातीं घेतलेल्या कामीं उत्तम प्रकारची परिपूर्तता मिळविण्याकडे लक्ष असून राजेसाहेबांच्या शिक्षणाचें जें महत्वाचें काम तें त्यांना नेमून देण्यांत आलें होतें, त्यासंबंधानें त्यांजकडून सतत व प्रेमपुरस्सर काळजी वाहण्यांत आली आहे. या त्यांनीं घेतलेल्या काळजीची मुंबईसरकाराकडून ज्याप्रमाणें कदर करण्यांत येते, त्याप्रमाणेंच आपल्याकडून कदर करण्यांत येत आहे, असें मानण्यास मला आधार आहे.

याप्रमाणें आपलें चाललें असतां, संस्थानांतील एकंदर कामें आपले सन्माननीय व तीर्थरूप हयात होते तेव्हां ते स्वतः फार हुशारीनें व दक्षतेनें पहात होते; आणि त्यांच्या मागून एक कारभारीमंडळ नेमण्यांत येऊन त्यांजकडूनही सदरहूप्रमाणेंच व्यवस्था ठेवण्यांत आली.

यासंबंधानें बोलतांना या संस्थानचे व खुद्द राजेसाहेबांचे खरे मित्र कर्नल उड्हौस व लीवार्नर साहेब या दोन सरकारी वजनदार अमलदारांविषयीं येथें उल्लेख करणें उचित आहे. यांपैकीं कर्नल उड्हौस हे आह्मांस सोडून परलोकीं गेले ही फार दुःखाची गोष्ट झाली. हे ज्या कामीं अलीकडे कांहीं वर्षें गुंतले होते, तें काम आपण स्वतः शेवटास न्यावें व राज्यकारभाराची जबाबदारी राजेसाहेब स्वीकारितील त्या वेळीं आपण हजर असावें, अशाविषयींची जी त्यांची उत्कंठा तीच त्यांच्या अकालीं मृत्यूस कांहीं अंशीं कारणीभूत झाली. राजेसाहेब, मला माहीत आहे कीं, आपला स्वभाव कोमल असल्यामुळें ज्या ह्या मित्राचें वियोगजन्यदुःख आह्मां सर्वांस होत आहे, त्याची व त्याच-

प्रमाणें त्याच्या कन्येची आजच्या प्रसंगीं आपल्यास आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं. या बाई अलीकडे कांहीं वर्षें आपल्या सामाजिक मेळयांत हमेश येत असत, आणि त्यामुळें त्या मेळयांस एका प्रकारचें सौंदर्य प्राप्त होत असे. या बाई आज येथें हजर असत्या तर फार चांगलें झालें असतें.

आतां लीवार्नर साहेब यांच्याविषयीं मी इतकेंच सांगतों कीं, या संस्थानच्या संबंधानें व खुद्द राजेसाहेबांच्या संबंधानें त्यांच्या ठायीं जी हितबुद्धि होती, तींत किंचित्‌ही कमतरता झाली नाहीं. ते आजच्या समारंभास हजर नाहींत, याचें कारण एवढेंच आहे कीं, जनाबेअह्ली व्हाइसराय यांच्या कौन्सिलांतील काम संपे तोंपर्यंत त्यांना तेथें राहणें जरूर आहे.

राजेसाहेब, आतां कारभारीमंडळीनें ज्या कांहीं विशेष महत्वाच्या सुधारणा करण्याकडे आपलें लक्ष पोंचविलें आहे, त्या मी थोडक्यांत सांगतों.

प्रथमतः आपल्या संस्थानची जमीनमहसुलाची पद्धति व्यवस्थेशीर करण्यांत आली. सन १८८९।९० सालीं दिवाणसाहेब यांजकडून असें कळविण्यांत आलें आहे कीं, इनाम जमिनींशिवायकरून खुद्द कोल्हापूर सरकारच्या संस्थानाच्या सर्व भागांतील जमिनींची मोजणी होऊन आकार ठरविण्यांत आले आहेत.

दुसरें असें कीं, कोल्हापूर संस्थानांतील सर्व कायदे एकत्र करून त्यांची व्यवस्था लावण्यांत आली आहे. आणखी असें कीं, व्यापाराला जीं बंधनें होतीं तीं पुष्कळ अंशीं काढून टाकण्यांत आलीं. सन १८८४ सालीं यासंबंधीं संस्थानांत जी व्यवस्था होती, तिजवरून आयात व निर्गत मालावर जकात घेण्यांत येत असून, संस्थानाच्या हद्दींतून फक्त जाणाऱ्या येणाऱ्या मालावर रहदारी जकात नव्हती; परंतु जकातीचा मक्ता देण्यांत येत असल्यामुळें व आयात मालावर

एक वेळ जकात घेतल्यानंतर तोच माल पुनः बाहेर जातेवेळीं जकात द्यावी लागणार नाहीं, अशी कोणत्याही प्रकारची हमी नसल्यामुळें व एकवार दिलेली जकात परत मिळण्यास मार्ग नसल्यामुळें, व्यापारास अनेक अडचणी होत्या.

सन १८८९ सालीं वरील व्यवस्था बंद करण्यांत आली आणि अशा रीतीनें अदमासें पाव लाख रुपयांचा वसूल सोडून देण्यांत आला. कोल्हापूर दरबारानें हें जें दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांस उदाहरण घालून दिलें, तें जनाबेअली गव्हरनर जनरल इन्कौन्सिल यांस फार पसंत पडलें. तहनामे झालेल्या जहागिरदारांनींही या चांगल्या उदाहरणाचा कित्ता लागलाच वळविला, आणि त्यामुळें असें झालें आहे कीं, १९ लाख वस्तीच्या व ६½ हजार मैलांच्या प्रदेशाची स्थिति अप्रतिबंध व्यापाराच्या संबंधानें जवळील इंग्रज सरकारच्या मुलखाच्या स्थितीप्रमाणेंच झाली आहे.

राजेसाहेब, आपल्या संस्थानच्या हिशेबावरून आपल्यास असें दिसून येईल कीं, ही सुधारणा होण्यापूर्वीं दरसाल एकंदर महसुलाची जी सरासरी पडत होती, तिजपेक्षां सुधारणा झाल्यानंतरच्या सालांतील सरासरी बरीच वाढली आहे. अर्थात् सदरहू सुधारणा अमलांत आणल्यापासून संस्थानचें नुकसान झालें आहे असें मानण्यास किंचित्‌ही आधार मिळणार नाहीं.

याचप्रमाणें वंशपरंपरा चालणाऱ्या वहिवाटीच्या संबंधानें अनेक भानगडीच्या बाबींचा निकाल लावण्यांत आला आहे.

कापशी सरंजामापैकीं कदीम इनामाच्या संबंधानें तेथील संस्थानिकाचा नजराणा घेण्याचा सदरहू संस्थानिकाच्या संबंधानें नवीन संस्थानिकाची नेमणूक करणें, तोरगल सरंजामाच्या संबंधानें कोल्हापूर सरकारचे स्वामित्वाचे हक्क यावे अशाच प्रकारच्या दुसऱ्या बाबी यांच्या संबंधानें, तत्क्षणीं यांकडून आपापले हक्क दाखविण्यांत आल्यावर,

मुंबई सरकारानें त्याजविषयीं विचार केल्यावर नामदार स्टेट सेक्रेटरी यांजकडून अखेरचे हुकूम देण्यांत आले आहेत. तसेंच सार्वभौम सरकारानें जहागिरदारांच्या संरक्षणाबद्दल दिलेल्या हमीच्या संबंधानें, अशाच महत्वाची दुसरी अशी एक गोष्ट आहे कीं, कोल्हापूरपैकीं तहनामे झालेल्या जहागीरदारांच्या दिवाणी व फौजदारी कोर्टाचे अधिकार सरकाराकडून ठरविण्यांत आले आहेत.

आणि शेवटची गोष्ट अशी आहे कीं, आपल्या राजधानीचें हें शहर दक्षिण महाराष्ट्रदेशांत जाणाऱ्या आगगाडीच्या मुख्य रस्त्याशीं स्टेट रेल्वेचा एक फांटा करून जोडण्यांत आलें आहे. या स्टेट रेल्वेच्या संबंधानें आपल्या संस्थानाकडून जें भांडवल घालण्यांत आलें आहे, त्याजवर जरी अद्याप राजेसाहेबांस विशेष द्रव्यलाभ होण्यासारखा नसला, तरी नवीन नवीन व्यापाराचीं ठिकाणें सुरू झाल्यामुळें आपल्या प्रजेस, तसेंच शेती जमिनीस अधिक मागणी होऊन आपल्यासही अन्य रीतीनें फायदा होण्याचा बराच संभव आहे.

आपण ह्या विस्तीर्ण हिंदुस्थान देशांत तसेंच जवळील सिंहलद्वीप नामक बेटांतही प्रवास केला आहे. आपल्या तीर्थरूपांची इच्छा अशी होती कीं, आपण इंग्लंद देशही पहावा; परंतु जरी आपल्यास अद्यापपर्यंत तसें करितां आलें नाहीं, तरी त्यांच्या इच्छेस आपण मान देत आहां याजविषयीं मला किंचित्‌ही शंका नाहीं, असो, अनेक देशांतील राज्यपद्धति आपण प्रत्यक्ष पाहिल्या आहेत; आतां त्यांपैकीं कोणती ह्या संस्थानांत चालू करावी याचा निर्णय करणें आपणांकडे आहे. राज्याचें काम व्यवस्थित रीतीनें चालण्यास हरकत येऊं नये, याकरितां, कारभारीमंडळ प्रस्तुत कायम ठेवण्याचा जो आपण विचार केला आहे, तो माझ्या मतें शहाणपणाचा आहे. आतां हें मंडळ फक्त कारभाराशीं त्यांचा जेवढा संबंध आहे, तेवढ्यापुरतेंच कायम

ठेवावयाचें आहे. कारण त्यांची राजसत्ता, आपण तख्तारूढ झाल्याबरोबर नाहींशी होणार हें उघड आहे.

कारभारीमंडळ कायम ठेवण्याची जी आपली योजना आहे ती आपल्या राज्यांत कोणती राज्यपद्धति असावी याचा आपणांकडून निर्णय होई तोंपर्यंत त्या मंडळाचा उपयोग सल्लामसलत घेण्याचे कामीं व्हावा येवढ्याकरितां आहे.

राजेसाहेब, तहनाम्यांतील करारान्वयें राजकीय प्रकरणीं जी सल्ला आपणांस घेणें प्राप्त आहे, तिजमुळें या महत्वाच्या बाबतींत आपणास कोणत्याही प्रकारें हरकत होऊं नये. मित्रभावाची सल्ला घेणें आपल्यास जरूर वाटल्यास ती पुष्कळ ठिकाणीं आपणांस मिळण्यासारखी आहे. परंतु राजेसाहेब, आपण एवढें मनांत वागविलें पाहिजे कीं, जो कांहीं अखेरचा निर्णय करण्यांत येईल त्याची जबाबदारी फक्त आपल्यावरच आहे, आणि राज्याच्या कर्तव्यांपैकीं हें निर्णय करण्याचें काम अत्यंत महत्वाचें असल्यामुळें माझी अशी विनंति आहे कीं, इहलोकीं या कामीं जी कांहीं सल्लामसलत मिळण्यासारखी आहे, तिच्याहून बलवत्तर व हितप्रद अशी जी ईश्वरी प्रेरणा, तिलाच अनुसरून आपण चालावें.

मागील हकीकत व पुढील वर्तन यासंबंधानें मी एवढा वेळ बोललों; आतां या समारंभाच्या उद्देशाच्या संबंधानें मला बोलावयाचें आहे.

राजेसाहेब, या आनंदाचे प्रसंगीं आलीजनाब व्हाइसराय साहेब आपलें अभिनंदन करितात हें आपल्यास कळविण्यास व इंग्रज सरकार आज रोजीं कोल्हापूर संस्थानचा कारभार, हक्कदार राजाच्या स्वाधीन करीत आहे, आणि अशा रीतीनें एतद्देशीय संस्थानें कायम ठेवण्याचे कामीं मलिकामा अझमा केसरइहिंद यांच्या ठिकाणीं वसणाऱ्या कळकळीची सानुग्रह हमी देत आहे हें आपल्या सरदारांस व प्रजाजनांस जाहीर करण्यास मला फार संतोष वाटतो.

माझी अशी खात्री आहे कीं, आपल्यावर जी आज जिम्मा सोंप-

विण्यांत आली आहे तिचे तसेच आपल्या अमलाखालीं असलेले जहागिरदार व इतर लोक यांचे हक्क कायम ठेवून, त्यांचें प्रतिपालन करण्याची जी आपली जबाबदारी, तिचें खरें महत्व व पोलिटिकल एजंट हे तहनाम्याप्रमाणें आपणांस जी सल्लामसलत देण्यास व जी मदत करण्यास बांधले गेले आहेत त्यांची खरी किंमत आपण जाणत आहां. राज्याच्या उत्कर्षाचा मजबूत पाया ह्मटला ह्मणजे प्रजेचें कल्याण व न्यायी आणि पुरोगामी अशी राज्यकारभाराची पद्धति हा होय. हें तत्व आपणांस अवगतच आहे.

राजेसाहेब, ज्या गादीच्या ठिकाणीं शहाणपणा, कळकळ आणि न्यायाची इतःपर आपल्या प्रजाजनांकडून अपेक्षा करण्यांत येणार आहे, त्या गादीवर बसविण्याकरितां मी आतां आपल्यास नेतों. आणि या वेळेस मी आपल्यास आग्रहपूर्वक असें सांगतों कीं, आपण आपलें राज्य कोणत्याही प्रकारची भीति न बाळगितां किंवा कोणाचाही पक्षपात न करितां केवळ सत्यास सरून चालवावें. शेवटीं माझी अशी प्रार्थना आहे कीं, लहानमोठ्या अशा सकल जनांच्या आयुष्यक्रमांतील घडामोडी घडवून आणणारा असा जो सर्वसत्ताधीश परमेश्वर, तो आपल्या हातून अशीं कृत्यें करवो कीं, त्याच्या योगानें संतुष्ट प्रजेचा मान व प्रेम हें जें सुज्ञ राजाचें मोठ्यांत मोठें बक्षीस तें आपल्यास प्राप्त होवो.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

गवर्नरें मग छत्रपतीतें सिंहासनिं स्थापीला ॥
राजसूत्रें तीं अर्पण करुनी तुष्टवि सकल जनांला ॥
शोभा बहु आली ॥ जणुं ती इंद्रपुरी दिसली ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग—मल्हार.

इंग्रजी सेनेकडून ॥ तत्काळ सलामी प्राप्त होऊन ॥
तोफांची सरबत्ती दणाणून ॥ उत्सवार्थ होतसे ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

छत्रपती हा शाहू जेव्हां सिंहासनिं बसला ॥
सर्व जनांला आनंददायक सूदिन हा ठरला ॥
झाला पूर्ण खरा ॥ सणांतचि जसा शोभे दसरा ॥ १ ॥

या वेळीं महाराजांचे मुखश्रीकडे पाहिलें तेव्हां शोभा (राम, धर्म, नळराजा यांप्र० ) दिसली.

॥ श्लोक ॥ मालिनी वृ०

दशमुखरिपुं जेंवी, सूर्यवंशीं नृपाळ ॥
हलधर अनुजाचा, भक्त जो भूमिपाळ ॥
कलिमलदहना जो, पुण्यकारी नृपाळ ॥
सकल गुण वरी तो, तेंवि हा लोकपाळ ॥ १ ॥

॥ आर्या ॥

संभाषण करि भूपहि हॅरिसच्या भाषणास अनुसरुन ॥
कथितो दिवाण त्याचें भाषांतर साग्र प्रीतितें करुन ॥ १ ॥

नेक नामदारसाहेब—

माझ्या संस्थानाचा कारभार माझ्या हवालीं गौरवानें करितांना नेक नामदार साहेबांनीं जें आतां उपदेशपर असें गंभीर भाषण केलें, तें मीं एकाग्र चित्तानें ऐकिलें, तें मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. त्या भाषणांत नामदार साहेबांनीं अलीकडील अल्पवयस्क राजाच्या कारकीर्दीत घडलेल्या मुख्य गोष्टींचा उल्लेख केला आहे.

त्या गोष्टींवरून, कोल्हापुरांत गेल्या तीन वर्षांत सुधारणेचें पाऊल झपाट्यानें पुढें पडत आलें हें व्यक्त होतें. हे मजवर मलिकामा अझमा महाराणी केसरइहिंद सरकार यांचे मोठे उपकार आहेत, व त्या उपकारांबद्दल मी त्यांचा अंतःकरणपूर्वक आभारी आहें. हे त्यांचे मजवरील उपकार दोन गोष्टींबद्दल आहेत. पहिली—माझ्या संस्थानाबद्दल

घेतलेली काळजी व दुसरी—माझ्या स्वतःच्या कल्याणाकरितां माझ्या अगदीं बाळपणापासून त्यांनीं केलेल्या तजविजी.

या संस्थानच्या बऱ्याकरितां आजपर्यंत गेलेल्या गोष्टींकडे पाहिलें असतां, हल्लींचें कोल्हापूर गेल्या पिढीच्या कोल्हापुराहून अगदीं निराळें आहे असें ह्मणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. हिंदुस्थानच्या बऱ्याच भागांतील जे थोडे बहुत भाग माझ्या अवलोकनांत आले आहेत, त्यावरून आज माझ्या हातीं आलेल्या राज्यापेक्षां अधिक सुव्यवस्थित राज्य थोड्याच राजेरजवाड्यांच्या स्वाधीन झालें असेल, असें मी निःशंकपणें समजतों.

याबद्दल मी अल्पवयी असतां सरकारांतून वेळोवेळीं नेमलेल्या ज्या अनेक पोलिटिकल एजंटांनीं माझे राज्यकारभारावर देखरेख केली, त्यांचा मी आभारी आहें. त्याप्रमाणेंच ज्यांनीं माझे अल्पवयांत राज्यकारभार सुयंत्र चालवून यश संपादिलें, त्यांचे ह्मणजे खानबहादूर मेहेरजीभाई कुबरजी सी-आय-इ-माझे वाकबगार दिवाण व कौन्सिल यांचेही मी फार आभार मानितों. आणखी माझे कै० ती० कोल्हापूरचे माजी रीजंट, ( ते आपल्या मरणानें लोकांस हळहळ लावून गेले ) त्यांचा जो मजवर मोठा ऋणभार आहे, त्याचाही उल्लेख अशा प्रसंगीं केल्यावांचून माझ्यानें पुढें बोलवत नाहीं.

ह्या संस्थानच्या सुधारणेच्या कामीं सरकारांनीं फार दक्षतेनें नजर पुरविली, तिजबद्दल तर मी त्यांचा फार आभारी आहेंच. पण मला योग्य रीतीनें लहानाचा थोर करण्याच्या कामांत जी कळकळ मुंबई इलाख्याचे गव्हरनर सर जेम्स फरग्युसन व लॉर्ड रे यांनीं आपण होऊन खुद्द स्वतः बाळगिली आणि जी नामदारसाहेब, आपणही इतक्या ममतेनें पुढें तशीच राखिली, तिजबद्दलही आपला व त्या उभयतांचा मी कमी उपकार मानितों असें नाहीं. तसेंच जवळजवळ पांच वर्षें मे० फ्रेजर साहेब यांच्या देखरेखीचा व शिक्षणाचा मला मोठा लाभ झाला तोही खरोखर याच कळकळीचें फळ होय. त्यांना मी माझे मित्र सम-

जतों. व त्यांच्या संबंधानें मी आतां फक्त इतकेंच सांगतों कीं, त्यांनीं माझे बंधूविषयीं व मजविषयीं जी मोठ्या हुषारीनें अंतःकरणपूर्वक व पित्याप्रमाणें काळजी वाहून आह्मां उभयतांस आमच्या भावी उच्चपदास शोभे असें शिक्षण दिलें तिजबद्दल आह्मी दोघेही आजन्म त्यांचे ऋणी राहूं.

येथून पुढें माझा हेतु अगदीं शुद्ध अंतःकरणानें असा जाहीर करतों कीं आमच्या परम कृपाळू मलिकामा अझमा केसरइहिंद महाराणी सरकार यांचे ठायीं मी निष्ठा ठेवून ज्या करारांनीं, तहनाम्यांनीं व सनदांनीं सार्वभौम सरकाराशीं माझे संबंध नियमित झाले आहेत ते करार, तहनामे व सनदा मी इमानें इतबारें पाळीन. आतां माझ्या प्रजेच्या कल्याणासाठीं आजपर्यंत त्यांनीं पुष्कळ गोष्टी केल्या आहेत व तेणेंकरून आज माझ्या हातांत फार अनुकूल स्थितीमध्यें राज्यसूत्रें येत आहेत. या दोन्ही गोष्टी तर माझ्या मनांत पूर्णपणें वागतात; तथापि मी असें पक्कें समजतों कीं, राज्यकारभारामध्यें निश्चल राहतांच येत नाहीं. तसेंच मला एक फार महत्वाचें व जोखमाचें कर्तव्य आहे, ह्मणजे माझी प्रजा हल्लीं ज्या सुखाचा उपभोग घेत आहे, ती फक्त कायम राखिली कीं झालें असें नाहीं तर माझ्या प्रजेच्या कल्याणाची वृद्धि उत्तरोत्तर निश्चयानें होत जाईल, अशी खबरदारी मला घेतली पाहिजे. ह्या महत्वाचे कामीं माझे पदरचे संस्थानिक व जहागिरदार यांजकडून मला राजनिष्ठापूर्वक हातभार मिळेल, असा माझा भरंवसा आहे. आणखी जसे मी त्यांचे हक्कांना जपत जाईन, तसेंच तेही, त्यांचे पूर्वज माझ्या पूर्वजांच्या कारकीर्दींत राज्याचे खरे आधारस्तंभ होते, तद्वतच आतां देखील होतील अशी मी पूर्ण उमेद बाळगतों.

मी मनांत उत्कृष्ट कित्ता वागवून, त्याप्रमाणें मला उपलब्ध असलेल्या महत्वाच्या संधीचा उपयोग करून घेण्यास झटेन. नामदारसाहेब व त्यांच्या पूर्वींचे मुंबई इलाख्याचे गवरनर यांचा जसा माझ्या अल्पवयांत मला आश्रय मिळत गेला तसाच भावी गवरनरांकडूनही माझ्या

प्रौढावस्थेंत मिळेल, अशी माझी आशा आहे. माझे वडील कैलासवासी झाल्यादिवसापासून तों आजपर्यंत मे० लीवार्नरसाहेब यांची मजविषयींची कळकळ तिलप्राय कमी झाली नाहीं; माजी पोलिटिकल एजंट कर्नल उड्हौस (ज्यांच्या मृत्यूबद्दल माझ्याहून थोड्यांनाच ज्यास्त वाईट वाटलें असेल ), हे माझ्या हिताकरितां फार झटत असत, व हल्लींचे पोलिटिकल एजंट कर्नल हंटरसाहेब हेही तसेंच माझें हिताहित पहात आहेत. ह्या आजपर्यंतच्या माझ्या माहितींतल्या पो० एजंटांप्रमाणें पुढील पो० एजंटही मजबरोबर चांगल्या स्नेहभावानें वागतील अशी मला फार उमेद आहे; व मीही त्यांची सल्लामसलत खुषीनें घेत जाईन. या सर्व उमेदीवरून मला आज राज्यकारभार हातीं घेण्यास मोठा उत्साह येत आहे.

शेवटीं नामदारसाहेब, आपणांस मी विनंति करितों कीं, नेक नामदार व्हाइसरायसाहेब यांजकडून आनंदप्रदर्शक मोठ्या ममतेचा निरोप आला आहे, त्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहें, असें आपण त्यांस कळवावें.

॥ आर्या ॥

**विजयोत्साहें मग श्रीशाहू भेटे जयीं हारिसाला ॥**
**कांचनमय मुष्टि जया स्वीकारी धन्य तो अशा असिला ॥ १ ॥**

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमाळी.

॥ चा० रामजोशाचे लावणीप्र० ॥

**शालजोडि जरिकांठी भरजरी, वस्त्रातें दीधलें ॥ जनांसी कौतुक वाटलें ॥ तदनंतरही नामदार ते, श्रेष्ठांना भेटले ॥ नृपा जे कौन्सिलर शोभले ॥ जहागिरदारा, आप्तातेंही, आनंदें भेटले ॥ क्रमानें वर्णाया साजलें ॥ १ ॥**

मग नामदार साहेबांनीं महाराजांस हार तुरे विडे इ० दिले.

॥ श्लोक ॥ रथोद्धता वृ०

अत्तरा मग गुलाब अर्पिती ॥
देउनी जन तयींच तुष्टती ॥
स्वर्गिही अमरनायकें अहा ? ॥
अंगुली वदनिं घातली पहा ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

*सेक्रेटरी प्रभृति मंडळींनीं ॥
संस्थानिकांसी हार तुरे देउनी ॥
तदनुरूप कौन्सिलरश्रेष्ठीं इतर जनातें करूनी ॥
दरबारसमाप्ती केली असे ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

अंबिकेच्या दर्शनासाठिं जेव्हां ॥
दरबारांतुन मग स्वारि निघे तेव्हां ॥
राजमार्गाच्या दोन्हि बाजुंनाही ॥
रम्य शोभा देखिली सांगु कांहीं ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

नमन करूनी आदिभवानी श्रीजगदंबा माई ॥
प्रासादांतिल सर्व देवता दर्शन घेउनि जाई ॥
नूतन प्रासादा ॥ नृपाचा थाट असे साधा ॥ १ ॥

सोमवारीं मोठ्या थाटानें, राज्याधिकारग्रहणसमारंभ झाला. समारंभ झाल्याबरोबर श्री० महाराज छत्रपति यांजकडून खालीं दर्शविलेल्याप्रमाणें जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला.

## जाहीरनामा.

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके २३० विजयनामसंवत्सरे फाल्गुन

---

* सेक्रेटरी=नामदार साहेबांचे सेक्रेटरी.

वद्य ११ इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहूछत्रपति स्वामी यांजकडून—

ह्या जाहीरनाम्याच्या द्वारें कोल्हापूर इलाख्यांतील आमच्या तमाम प्रजाजनांस जाहीर करण्यांत येतें कीं आजपर्यंत आह्मी अल्पवयी असल्याकारणानें, कोल्हापूर संस्थानचा राज्यकारभार "कौन्सिल ऑफ़ ॲड्मिनिस्ट्रेशन" यांच्या हातून चालविण्यांत येत होता, परंतु आह्मी आतां प्रौढावस्थेंत आल्याकारणानें, आज रोजीं त्यांची कारकीर्द संपून आमच्या राज्याचा पूर्ण अखत्यार आमच्या हातीं आला आहे; व त्याप्रमाणें आह्मी आज ह्मणजे तारीख दोन माहे एप्रिल इसवी सन एक हजार आठशें चौऱ्याण्णवपासून तो चालविण्यास सुरवात केली आहे.

आमची सर्व प्रजा सतत तृप्त राहून सुखी असावी, तिचे कल्याणाची सतत वृद्धि व्हावी, व आमचे संस्थानची हरएक प्रकारें सदोदित भरभराट होत जावी, अशी आमची उत्कट इच्छा आहे. हा आमचा हेतु परिपूर्ण करण्यास आमच्या पदरचे सर्व लहानथोर आदिकरून तमाम प्रजाजन शुद्ध अंतःकरणापासून मोठ्या राजनिष्ठेनें आह्मांस साह्य करितील अशी आमची पूर्ण उमेद आहे. ही आमची कारकीर्द दीर्घ काळपर्यंत चालवून सफल करावी अशी मी त्या जगन्नियंत्या परमात्म्याची एकभावें प्रार्थना करितों.

कोल्हापूर नवीन राजवाडा. ता० २ एप्रिल १८९४.

---

## भाग चवथा.

तारिख ३ एप्रिल १८९४ मंगळवार.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

**सन अठराशें चवऱ्यांण्णव सालीं एप्रिल महिन्यामाजी ॥**
**मुखत्यारीचीं वस्त्रें दिधलीं तारिख द्वितीय रोजीं ॥**
**सुखविल सहजचि सर्वांला ॥ भूपति राज्यपदीं बसला ॥ १ ॥**

॥ कटाव ॥

पहावी मुखत्यारीची मजा ॥ बोलती ऐशी सारी प्रजा ॥ कोणि हिंडती राजद्वारीं ॥ कोणि बैसती देवद्वारीं ॥ कोणी उपवन शोधित जाती ॥ भोजनाचा थाट देखती ॥ चांदीसम ते पाट शोभती ॥ जाण्या इतरां वाट नसे ती ॥ कोणी तेथें न्हाट न वदती ॥ पाहुनि ऐसें तेव्हा चित्तीं ॥ आनंद मानुनि रमतचि जाती ॥ कोणी लंकेसाठिं धांवती ॥ कोणी मृदंगनादा करिती ॥ कोणी सतारही वाजविती ॥ कोणी दीपोत्साहीं रमती ॥ कोणी नृत्यकलेतें बघती ॥ कोणा गायनाची प्रीती ॥ कोणी श्रीबागेतें जाती ॥ कोणी टाउनहाला बघती ॥ कोणी गुजरिंत बसुनि पहाती ॥ स्वारीची ती शोभा ऐशी ॥ आघाडीला करी असती ॥ वरती शुंडा करुनि गर्जती ॥ स्वारांचीं तीं घोडिं धांवती ॥ कोतवालि ते अश्व वदुं किती ॥ एका दों पायींच नाचती ॥ हुद्देवाल्यांची नाहिं परिमिति ॥ हयरथवहानीं तेव्हां स्वारी ॥ पोषाख ज्याचा लख लख भारी ॥ टकमक तेव्हां गवाक्षद्वारीं ॥ उभ्या राहुनी पहाति नारी ॥ निरखुनि ऐशी शोभा सारी ॥ बलवंतातें आनंद भारी ॥

शनवारवेशीनजीक रयततर्फे मानपत्र देण्यकरितां भव्य मंडप तयार केला तिकडे श्री. म. छत्रपती यांचें आगमन.

ता० ३ माहे एप्रिल १८९४ मंगळवार.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

रयत लोक ते उत्साहानें मंडप ऊभारीती ॥
शनीवेशी बाह्यप्रदेशीं जन गडबडिनें जाती ॥
ऐसा सुंदर तो ॥ मंडप भव्य कसा दिसतो ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

तालुक्या तालुक्याचे जन ॥ स्थानीं स्थित व्हावें ह्मणून ॥
पाट्यावरतीं संज्ञा करून ॥ लाविल्या होत्या त्या स्थळीं ॥ १ ॥

॥ आर्या ॥

मंडप सन्मुख गर्जती द्वयस्थानांला किती दिसे रम्य ॥
दुंदुभिनादें झाले जन सारे मानसीं कसे रम्य ॥ १ ॥

स्वारी ८॥ वाजतां आली. दरवाज्यांत येतांच जी स्थिति घडली ती.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

मंडपसन्मुखीं स्वारीचें आगमन ॥
होतांचि विद्यार्थी सुस्वर गायन ॥
करिती आणि पुष्पवर्षाव करून ॥
नृपालागीं तोषविती ॥ १ ॥

॥ आर्या ॥

मग छत्रपती भूपहीं राज्यासनिं बैसुनी कसा शोभे ॥
भासे शिवछत्रपती कीर्तीनें गाति सर्व ज्या लोभें ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ मालिनीवृत्त.

गजबज जनदाटी मंडपीं फार होते ॥
नृप त्वरितचि येई राजसिंहासनातें ॥
रयत उदमि येती कामदारादि मोठे ॥
स्थळ न गमत तेथें पाद द्यायासि कोठें ॥

॥ साकी ॥ राग—जोगी ता० धुमाळी.

राजोपाध्ये आपासाहेब अध्यक्षस्थानीं असती ॥
रयततर्फे अभिनंदन त्या पत्रातें स्फुट करिती ॥
सादर ऐका हो ॥ बरवें चित्तांतचि राहो ॥

श्री. महाराज शाहूछत्रपति सरकार करवीर स्वामीचे शेवेसीं. कोल्हापूर प्रांतस्थ जहागिरदार, सरदार, मानकरी, इनामदार, व्यापारी वगैरे प्रजेची सविनय विज्ञापना ऐशीजे—सांप्रत कोल्हापूर राजधानींत होत असलेला महोत्सव पाहून, आह्मां सर्व आबालवृद्धांस अतिशय आनंद होत आहे. इतकेंच नाहीं, तर आह्मांप्रमाणेंच हा महोत्सव पहा-

णाऱ्या व त्याची सुवार्ता ऐकणाऱ्या इतर प्रांतस्थ जनांसही आह्मां-प्रमाणेंच आनंद झाला असेल. हें निःसंशय आहे. कारण महाराष्ट्रदेशीय शककर्त्या प्रसिद्ध श्रीशिवाजी प्रभूची ही गादी असल्यानें तिजवर सर्व महाराष्ट्रदेशीयांचें सहज प्रेम आहे. त्या गादीसंबंधानें आज फार वर्षांनीं हा महोत्सवाचा समय आला आहे, तेव्हां अशा समयीं आह्मांस झालेल्या हर्षनिर्भराचें वर्णन करणें खरोखर अवश्य आहे. महाराज, आपण आपल्या कुलाप्रमाणें प्रतापशाली व भाग्यवान् असून आपले ठायीं सारासारविचार व ज्ञानसंपत्ति वास करीत आहे. सार्वभौम दोस्त सरकारच्या प्रेरणेनें, विद्यादान करण्यास नियोजिलेल्या विद्वान् गुरूंच्या शिक्षणानें व सहवासानें, आपणांस सुधारलेल्या एतद्देशीय व पाश्चात्य विद्यांचा जो संस्कार झाला आहे, त्या योगानें आपली बुद्धि प्रौढ झाली आहे. तसेंच आपण सर्व भरतखंडभर व सीलोन येथें प्रवास केल्यानें, आपणांस सर्व ठिकाणची राज्यस्थिति व लोकस्थिति यांचा परिचय झाल्यामुळें आपल्यामध्यें चातुर्य आलें आहे. शिवाय नुकतेंच आपण करवीर इलाख्यां-तही पर्यटण केल्यामुळें, आपल्यास आपल्या प्रजेची व देशाची स्थिति अवगत झाली आहे, याप्रमाणें आपल्या अंगीं सर्वगुणसंपन्नता आलेली पाहून, जगदीशेच्छेनें, मलिकामा अझमा महाराणी व्हिक्टोरिया केसरइ हिंद यांच्या अनुज्ञेवरून मुंबई इलाख्याचे गव्हरनर नेक नामदार लार्ड-हारिस साहेब यांनीं आपल्या राज्याचीं अधिकारसूत्रें आपल्या हातीं दिलीं आहेत याबद्दल आणि आजवर जें त्यांणीं आमचें स्वप्रजेप्रमाणें पालन केलें व राज्यव्यवस्था सुव्यवस्थित ठेविली त्यांजबद्दल आह्मी त्या सार्वभौमिणीचे व त्यांच्या प्रतिनिधीचे फार आभार मानीत आहोंत.

सर्व सुखाचें आदिकारण जें ज्ञान तें अनेक प्रकारांनीं आपल्या रा-ज्यांत मिळत आहे व त्या योगें सांप्रतकाळींही प्रजा ज्ञानसंपन्न झाली आहे व होत आहे. याप्रमाणेंच इतउत्तरही त्यांच्या ज्ञानवृद्धीविषयीं आपण कळकळ बाळगून आह्मां सर्वांस ज्ञानसंपन्न कराल अशी आह्मांस पूर्ण

आशा आहे. आपण सर्व करवीर इलाखा पाहिला आहे, त्यामुळें शेतकीची, व्यापाराची व धंद्याची स्थिति आपणांस पूर्ण अवगत झाली आहेच. तेव्हां तिची सुधारणा करण्यासाठीं एकंदरींत आमची सर्व प्रकारें उन्नति होण्यासाठीं आपण योग्य ते उपाय योजिल्यावांचून कधींही राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. आजपर्यंत येथील एकंदर राजकीय व्यवस्था योग्यप्रकारें चालत आली आहेच, तथापि आह्मां प्रजेविषयीं जी आपली सदयता यापूर्वीं आमच्या अनुभवास आली आहे, तिजवरून खरोखर आपल्या मुलाप्रमाणें आह्मां सर्वांचें कसल्याही प्रकारचें गाऱ्हाणें आपण अगोदर ऐकून घ्याल आणि आमचे ममतेनें व वात्सल्यानें लाड पुरवाल असा आह्मांस पूर्ण भरंवसा आहे.

ज्या जगदीशाच्या कृपेनें आह्मांस हे असे प्रेमाचे व आनंदाचे उद्गार काढण्यास मिळाले तोच ईश्वर आपणांस दीर्घायू करून आह्मांस आपल्या कृपाछायेखालीं चिरकाल राखो अशी त्याजवळ अनन्यभावानें आह्मी प्रार्थना करितों.

॥ आर्या ॥

**पत्रातें वाचुनियां करंडकामाजिं घालुनी त्यातें ॥**
**अर्पीयलें नृपातें स्वीकारुनि धन्य मानिलें ज्यातें ॥ १ ॥**

॥ **पद** ॥ राग ललितगौरी ता० धुमाळी.

॥ चा० ॥ जोशीबुवाचे चालीवर.

**पत्रासाठीं सिद्ध करुनियां आधिंच जो ठेविला ॥ करंडक रजताचा शोभला ॥ कांचनमय आणि चित्रविचित्र ही नकशीनें रेखिला ॥ असा तो दिव्य नयनिं देखिला ॥ पत्रांतिल आशया जाणुनी नृपती जें बोलिला ॥ कथितों व्यक्तपणें या स्थळा ॥ १ ॥**

जहागिरदार, सरदार, मानकरी, इनामदार, व्यापारी व इतर सभ्य गृहस्थहो, आपला आनंदप्रदर्शक मानपत्रांतील मजकूर ऐकून, मला

फार संतोष झाला आहे. मराठी राज्य स्थापन करणाऱ्या त्या महापराक्रमी श्रीशिवाजी महाराजांची ही गादी असल्यानें, तिजवर सर्व महाराष्ट्रदेशीयांचें प्रेम असणें हें स्वाभाविक आहे. सार्वभौम दोस्त सरकारांनीं मला शिक्षण देण्यास योजिलेले विद्वान् गुरु मेहेरबान फ्रेजर साहेब वगैरे, यांच्या सहवासानें मला जो कांहीं ज्ञानाचा संस्कार झाला आहे तो मी आपल्या प्रजाजनांच्या हिताकडे लावीन अशी माझी फार उमेद आहे; परंतु हा राज्यशकट सुरक्षित चालविणें हें एकट्या राजाचेंच काम नव्हे तर सर्व लहान थोर नोकर व प्रजाजन यांनीं निरपेक्षबुद्धीनें हातभार लाविला पाहिजे व तशी मदत मला मिळेल अशी माझी पूर्ण आशा आहे. मलिकामा अझमा महाराणी सरकार व त्यांचे ह्या इलाख्याचे प्रतिनिधि नेक नामदार लार्ड हॅरिस साहेब यांचे आपण सर्वांनीं आभार मानावे तितके थोडेच. कारण आजचा हा सुदिन केवळ त्यांच्या कळकळीचें फळ होय. आपण आज ह्या प्रसंगीं इतके श्रम घेऊन फार आनंद प्रदर्शित केला, याजबद्दल मी आपला फार ऋणी आहें. शेवटीं ज्या जगदीशानें आज बहुत वर्षांनीं आजचा हा सुदिन आह्मां सर्वांस दाखविला, तो असाच आह्मांस दीर्घकालपर्यंत राजसूत्रें इंग्रज सरकारच्या निर्धास्त छायेखालीं योग्य रीतीनें चालविण्यास बुद्धि देवो; अशी माझी प्रार्थना आहे.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

**रयततर्फे छत्रपतीतें अहेर अर्पण करिती ॥**
**भरजरि वस्त्रा नाम दुपेटा मौल्याची ती गणती ॥**
**जाहली चतुश्शत, कथितों स्पष्टचि हें खचित ॥ १ ॥**

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

**त्याचि समयीं अर्पुनी मंदिलातें ॥**
**कीनखापें मग तुष्ट करिति त्यातें ॥**
**चादरीद्वय देउनी भूषणासी ॥**
**कशी शोभा ये रम्य मंडपासी ॥ १ ॥**

म्युनिसिपालकमेटीकडील मानपत्र.

॥ **साकी** ॥ राग जोगी ता० धुमाळी.

कमिटीचा जो अध्यक्षचि तो ठकार ज्यातें वदती ॥
महोत्सवाच्या मंगलकार्यीं गात भूपति कीर्ती ॥ १ ॥

॥ **श्लोक** ॥ द्रुतविलंबितवृत्त ॥

म्युनिसिपाल कमेटिकडून तो
मग ठकारहि साग्रचि वाचितो ॥
रजतरूप करंडक आणुनी ॥
नृपकरीं दिधलेंचि समर्पुनी ॥ १ ॥

## ब्राह्मणभोजन.

॥ **पद** ॥ राग झिंजोटी ता० त्रिवट.

उपवनिं त्या खासबागीं, मंडप ते शोभती ॥ गडबडिनें ब्रह्मवृंदें, प्रेमानें धांवती ॥ अबलांना पृथक जागा ते स्थानीं दीसती॥ बुंदीच्या लाडवानें आनंदा मानिती ॥ १ ॥

शेणवी, गौड वगैरे लोकांना जागा निराळी केली होती.

**श्लोक.** कामदावृत्त राग अलैयाबिलावल ता० दादरा.

शेणवी तथा गौड त्या जनां ॥
राखुनी स्थळां योग्य कामना ॥
पूरती तदा हर्ष मानुनी ॥
जाति ते गृहीं कीर्ति गाउनी ॥ १ ॥

सदरहू समारंभाकरितां खेडोखेड्यांनीं पाटीलकुलकर्ण्याकडून दूध आणविलें.

॥ **ओवी** ॥ राग—मल्हार.

प्रांतांतील खेड्यांमधून । दुग्ध आणिलें घट भरून ॥
योग्य मोल पाठवून । ग्रामश्रेष्ठांकडे दीधलें ॥ १ ॥

ब्राह्मणांचें मन कशानें तृप्त होतें, व कोणता उपाय केला ह्मणजे आपल्यावर प्रीति करितात.

॥ पद ॥ चा० ॥ वद जाऊं कुणाला शरण करी जो हरण संकटाचें ॥

बहु प्रीति ब्राह्मणां जतन करी जो व्यसन भोजनाचें ॥ मिष्टान्न देउनी साचें ॥ अतिप्रेम जयांनीं धरिलें दक्षिणेचें ॥ पुरविती मनोरथ त्यांचे ॥ १ ॥

याचसाठीं दरबारांतून उत्तम प्रकारचा थाट केला तो.

॥ पद ॥ राग गौरी ता० धुमाळी.

॥ चाल ॥ शारदे, दासकामदे, कमलमृदुपदे प्रजापतितनये ॥

काय थाट ॥ गर्दि आचाट ॥ जहालि आफाट ॥ खास उपवनीं ॥ खास उ० ॥ नाहिं शोभा देखिली अशी कधीं या नयनीं ॥ १ ॥ भूदेव करुनि देव देव ॥ तशिच देव घेव ॥ जाति उद्याना ॥ जा०॥ लगबगिनें येउनी स्वस्थ बैसती स्थाना ॥ ब्राह्मणा ॥ मिष्टभोजना ॥ वरांतें दक्षिणा ॥ योग्य अधिकारी ॥ यो० ॥ अधिकारी ॥ जन देति तयांतें ह्मणति धन्य संसारीं॥२॥

खासबागेंत भोजनास जाण्याकरितां गडबडीनें रखुमाबाई गंगूताईच्या दारावरून चालली असतां गंगूताई तिला ह्मणते.

॥ पद ॥ राग पिलू ता० धुमाळी. ॥ चाल ॥ सखये अनुसुये थांबकि बाई ॥

अग ये रखुमाई, उभि राहा बाई ॥ मी येतें नको करूं घाई ॥ रडतो बाळक हा माझ्यापाईं ॥ मजला तें सुखकर नाहीं ॥ दुग्ध पीण्यातें, हाही लुब्धचि होई ॥ पाजवितें तोंवरि राही ॥ १ ॥

गंगूताईच्या सांगण्याप्रमाणें रखमाबाई किंचित उभी राहून मग तिला घेऊन चालती झाली.

॥ पद ॥ राग झिंजोटी ता० त्रिवट. ॥ चाल ॥ मजवरतीं खचित आहे ॥

बाळातें पाजवूनी, गंगुताई चालली ॥ कन्येसह उपवनासी,

लगबगिनें पातली ॥ कदलींचीं पात्रें त्यांनीं, दृष्टीनें पाहिलीं ॥ धैर्यातें स्वीकारूनी, स्वस्थानीं बैसलीं ॥ १ ॥

एक सावकाराची बायको, रस्त्यानें खासबागेंत भोजनास जाणाऱ्या अन्नपूर्णाबाईस विचारते कीं, बाई मंडपांत भोजनाची व तुमचेजवळ भांडें आहे त्यांत पाणी भरलेलें नाहीं, त्याची व्यवस्था कशी करणार? असें विचारतांच अन्नपूर्णाबाई तिजला सांगते; ऐका बाई—

॥ पद ॥ राग पिलू ता० धुमाळी. ॥ चा० ॥ उद्धवा शांतवन करजा ॥

उपवनिं त्या चावी आणुनी ॥ उदकानें पूर्णचि केली ॥ तळिं काहिल ती ठेवूनी ॥ वस्त्रानें बहु वेष्टीली ॥ उदकीं वस्तु घालुनी, कशि मौज दृष्टि देखीली ॥ पाहुनी वसंता जवळीं, जशि योग्य तशी रित केली ॥ चा० ॥ मंडपिं त्या ब्राह्मण शिरती ॥ कामगार द्वारावरतीं ॥ केशरी तिलक लावीती ॥ अशी ख्याती बाई केली ॥ १ ॥

अहो अन्नपूर्णाबाई, त्या ठिकाणीं मंडळी पुष्कळ असून पंक्तीही बऱ्याच असतील, त्याच्या वाडपाबिडपाची वाट तरी केली आहे?

॥ पद ॥ राग व ता० सदर चा० सदर.

कामगार तेथें बाई, पंक्तीस एक्या राही ॥ पाहिजे पदार्था आणुनी, प्रेमानें सर्वां वाही ॥ अशा पंक्ति मोजितां भारी ॥ मज न सुचे गणती कांहीं ॥ अंबिके धांवें आई, भूपातें सुचिरचि पाहीं ॥ १ ॥

ब्राह्मण भोजनास बसतात.

॥ श्लोक ॥ वृ० शार्दूलविक्रीडित ॥

भाता कालविती घृता मिळविती वर्णासही घालिती ॥
लिंबू तें पिळिती तसेंच लवणा जेवावया या रितीं ॥
भाज्यांतें वरिती अणीक चटण्या कोशिंबिऱ्या रायतीं ॥
नाना रीति तसे कधीं नच दिसे पक्वान्न जे वाढिती ॥ १ ॥

॥ अंजनीगीत ॥ राग झिंजोटी ता० धुमाळी.

ब्रह्मवृंद आकंठ जेवुनी ॥ पोटावरतीं कर फिरवूनी ॥
छत्रपतीतें आशिर्वचनीं ॥ गौरविते झाले ॥ १ ॥

॥ पद ॥ ता० व राग सदर.

स्त्रिया बोलती अंबाबाई ॥ जगज्जननी माझे आई ॥
नृपती आम्हुचा होवो विजयी ॥ प्रार्थितों तुजला ॥ १ ॥

रमण्याची दक्षिणा.

॥ रिसाला पद ॥ राग ललितगौरी ता० धु० ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला.

सायंकाळीं चवथे प्रहरीं चोफाळमाळावरी ॥ दक्षिणेलागिं आरंभा करि ॥ नाम रिसाला जन समजूनी येती माळावरी ॥ उभे हय चहुं बाजूं अंतरीं ॥ उत्तर दक्षिण दों बाजूंला ज्याच्या द्वारावरी ॥ शोभती तेथें पहारेकरी ॥ नग्न खड्ग किती करीं घेउनी ॥ राहती दुरच्या दुरी ॥ शिपाई ब्रह्मवृंद सावरी ॥ चा० ॥ उत्तर द्वारावरती, दक्षिणा, देती जे नामें त्यांची, ब्राह्मणा ॥ सांगतों मि या स्थानीं हो, साजणा, ॥ चा० ॥ राजोपाध्येसह आगाशे उत्तर द्वारावरी ॥ दक्षिणेलागिं आरंभा करी ॥ १ ॥ दक्षिणद्वारीं सर न्यायाधिश दक्षिणा देतसे ॥ जयाचे सकलांना भरंवसे ॥ स्वगृहिं ब्राह्मण येती त्यांतें द्रव्यातें देतसे ॥ अर्चना न्यूना करीत नसे ॥ अधिकाराच्या मदें करुनियां, गालिप्रदानीं नसे ॥ वाणि हे अवगत कविला असे ॥ एक रुपया देति दक्षिणा नियमचि ठरला असे ॥ पुरुषा याहुनि न्यून नसे ॥ २ ॥

ज्या मुलाची मुंज झाली त्यास पुरुष मानून पुरुषायेवढी दक्षिणा त्यास देण्याचा ठराव केला होता.

॥ श्लोक ॥ मालिनीवृत्त.

उपनयन जयाचें बालकाचेंचि झालें ॥
पुरुषसमचि त्यातें मानुनी तुष्ट केलें ॥

स्वजन मग तयांचे देखुनी तृप्त झाले ॥
वदत जय जयातें धन्य भूदेव गेले ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

अर्ध रुपया दक्षिणा योग्य देती ॥
स्त्रिया स्वीकारुनि हर्ष पावताती ॥
आमुचे भाग्याचें काय वदूं सूख ॥
बहुतां दिवशीं देखिलें राज-मूख ॥

मौंजीबंधनव्यतिरिक्त मुलांस चार चार आणेप्रमाणें दक्षिणा देण्यांत आली.

॥ पद ॥ राग ताल धुमाळी ॥ चाल ॥ विठाबाई माउली माय माझे वि.

चतुर्थांश रूपया अर्पिती उपनयनेतर मुला ॥ ध्रु० ॥
गडबड करुनी बालसमुह हा, एकचि सरसावला ॥चतु०॥
विजयि असो हा नृपती ऐसें बोलुनि आनंदला ॥ चतु० ॥

दक्षिणा रिसाल्यांत चालू आहे. कांहीं ब्राह्मण चुकून राहतील याकरितां घोडेस्वार शहरांतून ब्राह्मणांस पुकारत हिंडतात.

॥ पद ॥ चाल. उद्यां बघ जातें नृपसिंहासन रामातें.

दक्षिणा होती ॥ चोफाळ माळावरती ॥ अश्वारूढ स्वार ते दिसले ॥ ब्राह्मण भेटती त्यांसचि वदले ॥ तुह्मांसमान किति तरी जमले ॥ रिसाल्यावरतीं ॥ चला उठा मुखानें वदती ॥ दक्षि० ॥

रिसाल्याच्या आजूबाजूस दक्षिणा सुरू असतांनाच कैक ब्राह्मण दोनप्रहरच्या भोजनाच्या, व बुंदीच्या लाडवांच्या, व दक्षिणेच्या गप्पा मारीत बसले.

॥ श्लोक ॥ शिखरिणीवृत्त.

रिसाल्याच्या द्वारीं जनसमुह सर्वत्र जमला ॥
तथापीही आणी इतर जन येऊनि रमला ॥

जशीं स्थादें ज्यांना मिळति बसण्यालागिं गमले ॥
तशा स्थानातेंही वट वट करायासि रमले ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

उत्तर दक्षिण द्वारांतून । एकेक ब्राह्मणा दक्षिणा देऊन ।
भ्रान्तिप्रास्यर्थ गोत्र प्रवर पुसून । रिसाल्यामाजिं सोडिती ॥

चाल सदर.

ज्ञातीचे शूद्र असोनी । भूदेवासम वेष घेवोनी ।
वस्त्रें निर्मल परिधान करोनी । दक्षिणेलागीं प्रवर्तती ॥

॥ पद ॥ सूर्यवंशी रामराय जातसे वनीं.

अपात्रितें दान कधीं जाण निश्चयें ॥ करूं नयेचि स्पष्ट व्यास बोलिला मुखें स्वयें ॥ भूपशिरीं पातक हें येइ ह्मणुनियां श्रेष्ठ द्वारिं कष्ट करिति भारि जपुनियां ॥ १ ॥

॥ आर्या ॥

उपनयनावांचुनि जे, उपनयनाचाचि दाविति भाव ॥
यज्ञोपविता कंठीं घालिति तैशीच लंगुटी वाव ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ताल दादरा.

ऐसा बालक देखतां वेषधारी ॥
मंत्र गायत्री पूसती अधिकारी ॥
प्रश्नउत्तर बालकें टाळियेलें ॥
नीतिमार्गें द्रव्य तें न्यून झालें ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

जीं बालकें समर्पक उत्तरा देती। त्यांस पुरुषांसमचि द्रव्य ओपिती।
धर्मशास्त्रीं ऐशीच रीती । वदली असे सर्वत्र ॥ १ ॥

दक्षिणा देण्यास किती वेळ एकंदर लागला व इतर ज्ञातीला काय काय दिलें?

अभंग.

आरंभापासूनी अंदाजें पाहीलें ॥ गणित तें झालें सप्त तास ॥१॥
ब्राह्मणांवांचूनी अन्यत्र ज्ञातीला ॥ कौंडिती स्थळाला, वेगळेची॥२॥
अंध पंगू थोटे, ऐसे जे असती ॥ प्रत्येकासी देती कंबल वस्त्र ॥ ३ ॥
आणीकही धन तयांला अर्पिती ॥ चतुर्थांश देती अष्टमांश ॥ ४ ॥
इतर याचक जे का दीन असती ॥ तयांसीही देती अष्टमांश ॥५॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

ब्रह्मवृंद आणि स्त्रिया सर्वही आशिरवचना वदती ॥
अंध पंगू बधिरहि तैसे जयघोषातें करिती ॥
वाहवा धन्यचि भूपति हा ॥ लाभला आमुच्या सुकृतें पहा ॥

खासबागेंत ब्राह्मणभोजन झालें त्यांची संख्या.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

ब्रह्मवृंद ते खासउपवनीं । द्वादश सहस्र तृप्त होउनी ।
स्वमुखें जयघोषा वदुनी । प्रेमानंदें चालती ॥ १ ॥

दक्षिणेस किती रुपये खर्च आला तो.

दक्षिणेची परिमितता । एकसमयावच्छेदें गणितां ।
कथितों येथें निभ्रांतता । द्वादश सहस्र *मुद्रा झाली असे ॥

साहेबलोकांकरितां खाना.

अभंग.

गौरकायांसाठीं केलें तें भोजन ॥ टाउनहालिं जाण निश्चयेंसी ॥१॥
फुलें आणुनीयां उत्तम मोलाचीं ॥ नसे ती मूल्याची पर्वा जया ॥२॥
भूपाच्या उत्सवा गौरकाय आले ॥ ऐसें न देखिलें, पूर्वीं कधीं ॥३॥
भोजना सेवूनी गौर तृप्त होती ॥ ईश्वरा प्रार्थीती नृपासाठीं ॥४॥

साहेबलोकांकरितां मूल्यवान् फळें उत्तम प्रकारचीं आणिलीं होतीं. (विलायतेहून.)

---

* मुद्रा—रुपये.

॥ श्लोक ॥ हरिणीवृत्त.

नयनिं दिसती इंग्लंदाचीं महींत तशीं फळें ॥
कधिं न दिसलीं आह्मांलाही सभेंतचि भासलें ॥
प्रतिफलिं मला मौल्याची ती कमालचि वाटली ॥
निरखिलि नसे नेत्रांनीं मीं जनांतचि ऐकिली ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

गौरकाय स्वस्त्रियांसमवेत । महानंदें भोजन करित ।
तयां आवडे तैसाच बेत । सुस्थळीं केला असे ॥ १ ॥

## चिराखदानी. ( दीपोत्सव. )

गंगाबाई आणि यमुनाबाई दोघीजणी मैत्रिणी असून कोठें जरी देवाला वगैरे जाणें जहालें तरी दोघी मिळून जावयाच्या असा नियमच; तेव्हां दीपोत्सव बघण्यास जाण्याकरितां गंगाबाईस बोलावण्याकरितां यमुनाबाई आली; गंगाबाईचा यजमान गंगाबाईस रात्रौ बाहेर जाण्याविषयीं कधींच परवानगी देत नसे; यमुनाबाईनें गंगाबाईस हाक मारिली आणि ह्मणते.

॥ पद ॥ चा० तट जिचें बहुत तें रम्य वृक्ष शेजारीं.

चल गडे जाऊं पाहुंया राजाची स्वारी ॥ नृपाची स्वारी ॥
शोभली कशी मुक्त्यारीं ॥ चा० ॥ किति निशाणी दुंदुभी ध्वनी ॥
गर्जती ऐक साजणी ॥ गुंतलें चित्त परिसुनी ॥ चा० ॥ दीपोत्साह आहे ॥ स्वारिच्या दर्शना पाहे ॥

हें ऐकून गंगाबाई ह्मणते, सखे मी कसें करूं. माझी सर्व हकीकत तुला ठाऊक नाहीं वाटतें? सर्वप्रकारें माझें हित करणारी तूं आहेस; माझी स्थिति कशी? सांगतें जरा लक्ष देऊन ऐक.

॥ पद ॥ चा० बंजारा, मुजे छोड चला बंजारा.

आज्ञा नसे मला सुकुमारे ॥ पतिआज्ञा नसे सुकुमारे ॥ चा० ॥

असिसि जिवलग तूं मजलागे ॥ करिशी सर्वकाळ प्रिय मम गे ॥ चा० ॥ नजरभरी दीपांतें सारे ॥ पाहीन नृपा सुकुमारे ॥

समजलें. एकून तुझ्या नवऱ्याची मीं समजूत करून तुला घेऊन जावें; ह्मणजे यांतच माझा वेळ मोडावा; लोकांची गर्दी चालली आहे; कितीएक बायका गेल्या तुला यावयाचें असेल तर चल. मी आतां रहात नाहीं; ही निघालें पहा.

॥ पद ॥ उद्यां बघ जातें नृपसिंहासन रामातें.

आतां बघ जातें ॥ दीपोत्सव तो बघण्यातें ॥ आतां बघ० ॥ध्रु० ॥ आधीं पाहिन मी दीपांला ॥ सहजचि भूप दिसे मग मजला ॥ होइल त्रासचि तव चित्ताला ॥ असुनि गृहातें ॥ मन तल्लिन कैसें होतें ॥ आतां बघ जातें ॥ दी० ॥ १ ॥

परंतु गंगा, तुला घरांत टाकून मला एकटीला जाण्याला धैर्य होईना. अग, आज मोठा उत्सवाचा दिवस. जिकडे तिकडे चकचकाट दिव्यांचा प्रकाश पडला आहे; तुझे यजमान कृष्णराव तेही पाहण्यास जातीलच, मग आपण जावें. दिव्यांची शोभा किती ह्मणून सांगूं.

॥ पद ॥ दिसली पुनरपी गुप्त ज०.

दीपांची जी शोभा जहाली ॥ तुष्टचि होइन त्यांतें बघुनी ॥ दी० ॥ कृष्णा गोदादिक त्या गेल्या, उत्सव बघण्यालागूनी ॥ दी० ॥ बहुतां दिवशीं योगचि आला ॥ कैसा नकळे तुज अझुनी ॥ दी० ॥ गर्दी तेथें जहाली भारी ॥ सदय नृपातें पाहूनी ॥ दीपांची जी शोभा० ॥

गंगा—माझ्या मनाला किं नाहीं धैर्य अगदींच नाहींसें झालें; केव्हां दीपोत्सव व स्वारीचा थाट पाहीन असें झालें आहे. खरेंच माझें मन कसें वेड्यासारखें झालें पहा.

॥ पद ॥ शिवा न लावी हात मला.

खराच नाहीं धीर मना ॥ चल जाऊं जरा ॥ नृप पाहुं वरा ॥

गृहस्वामीची आज्ञा नसुनी ॥ येऊं कैशी गृह वर्जूनी ॥ राहिली मनकामना ॥ मलाहि नाहीं ॥ धीर खरा ॥ उपाय बरा ॥ सुचेना जरा ॥ नृप पाहुं बरा ॥ चल जाउं जरा ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

तद्नंतर त्या गंगा यमुना दीपांतें बघण्याला ॥
गेल्या पाहुनि आनंद भासत भारी मम नेत्रांला ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

राजवाड्याच्या गच्चिवर भारी ॥
दीपशोभा दीसली भव्य सारी ॥
नगारखान्यावर दीप पाजळीले ॥
कोठें कंदिल सुंदर ठेवियेले ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

उत्सवाप्रीत्यर्थ चार कमानी । तयार असती स्थानोस्थानीं ।
त्या सर्वही दीपांनीं पाजळोनी । रमणीय शोभा आणिली असे ॥१॥
एक जयंतीच्या पुलावरी । दुजी रंकाळ वेशीशेजारीं ।
तिसरी आणि चौथी नूतन प्रासादासामोरीं। ऐशा सुंदर शोभताती २

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमाळी.

प्रासादांतिल पटांगणामधिं स्थित होउनि राहती ॥ दिपांतें लक्षावधि लक्षिती ॥ ध्रु० ॥ तेथुनि जातां राजपथानें दीपांतें देखती ॥ शोभा जशि मुंबापुरिं दिसती ॥ हास्पितळापासूनि रम्य दिप, बहु यत्नें लाविती, क्रमानें ग्लासपात्र शोभती ॥ चा० ॥ किति डांब पुरूनी चक्रासम लाविले ॥ किति अर्धवर्तुलाकृतीच ते भासले ॥ आकृती त्रिकोणा दीपची किति देखिले ॥ चा० ॥ जिकडे पहावें तिकडे नयनीं जन दीपीं रंगती ॥ दीपांतें लक्षावधि लक्षिती ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

नूतन प्रासादापर्यंत । दीप ते सुशोभित दिसत ।
पहातां अत्यानंद अद्भुत । सर्वत्रांसी होतसे ॥ १ ॥

॥ आर्या ॥

हॉस्पिटळापासुनियां, गंगातट जो भला कसा शोभे ॥
तेथवरिच भूषविती, दीपोत्साहीं जनां समय लाभे ॥ १ ॥

॥ पद ॥ राग काफी ताल दीपचंदी. चा० साध्य नसे मुनिकन्या.

रम्य कशी दिपशोभा ॥ नयनीं दिसते ॥ रम्य० ॥ बघुनि
दिपांच्या विविध तऱ्हेला ॥ मम मन घेई बहु तोषाला ॥ मन
जरी कष्टचि असतें ॥ परि दीपा पाहुनी तुष्टचि होतें ॥ र० ॥ १ ॥
तैल घालण्या सिद्धचि असती ॥ स्नेहा घालुनि बाजुस राहती ॥
लोपे एकचि त्यासी ॥ अधिकारी जन दृष्टिस पडतें ॥ र० ॥ २ ॥
सायंकाळीं दिप पाजळले ॥ पहांटेपर्यंतचि जे टिकले ॥ गणाति
पहा कालाची ॥ जहाली नवमचि तासा गमतें ॥ र० ॥ ३ ॥

॥ साकी ॥ राग–जोगी ता० धुमाळी.

गुजरीमध्यें सावकार ते दीपोत्साहा करिती ॥
माड्यांवरतीं हंड्या झुमरें टांगुन ते ठेवीती ॥
शोभा कशि आली ॥ पाहुनि रम्य नृपा दिसली ॥ १ ॥

## वाक्यं.

श्री० महाराज छत्रपति यांचे दोन्ही वाड्यांत झालेला दीपोत्साह.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

हंड्या झुमरें ग्लासें आणी शामदान्या बहु असती ॥
लावुनि शोभा आणिली तेथें वर्णावी ती कीती ॥
दोन्ही प्रासादीं ॥ नयनीं रम्य दिसे गादी ॥ १ ॥

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमाळी.

कुलस्वामिनी आदिभवानी प्रासादीं शोभते ॥ नृपाची कुलदेवी गाजते ॥ तिच्या संनिध आरास बघतां मनास उल्हास ते ॥ होतसे गमना नच वाटतें ॥ धूम्रकेतु ग्रह सर्व भिंतिवर तारेही भव्य ते दीसती स्पष्टचि हें भासतें ॥ १ ॥

॥ आर्या ॥

सायंकाळापासुनी, भानूदय कालच्या सिमे आंत ॥
साडेअक्रा तासची, पाहती जन दीर्घकालपर्यंत ॥ १ ॥

हास्पिटलावरही सुंदर दिवे लाविले होते.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

हास्पिटलही बहुत सुशोभित दीपोत्साहें केलें ॥
द्रव्याचे ते सर्व व्ययही सरकारांतुन घडले ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

लायब्ररीच्या फंडांतून । म्यानेजिंग कमेटी भरून ।
मग सांगसन मंजूर करून । उत्तम प्रकारें दीप लाविले॥१॥

( लंका ) ॥ साकी ॥ राग जोगी ताल धुमाळी.

उत्सव बघण्यासाठीं जन ते परस्थ आले कीती ॥
अंदाजें मग पहातां झाली दीड लक्षांची गणती ॥ १ ॥

आतसबाजी ( दारूकाम ज्यास लंकाही ह्मणतात. )
हें काम कोठें केलें होतें, व थोडक्या व्यवस्थेबद्दल वर्णन.

॥ पद ॥ चा० पुष्पक विमानीं सेनेसह बैसुनी या चा० प्र० किंवा,
सफलेच्छा ती करीन सुरांची, आली मत्करिं तनु कैकयिची ॥ याप्र० ॥

पंचगंगातटीं ॥ वाळवंटीं ॥ होत उत्साहास ॥ लंकेच्या ॥ध्रु०॥
॥ चा० ॥ घाटावरतीं तंबू दिधले त्यांमाजीं श्रेष्ठां स्थळ केलें ॥ बाह्य प्रदेशीं विपुल राखिलें स्थानातें बघण्यास ॥ लंकेच्या होत ॥उ०॥
॥ १ ॥ पृथक पृथक विनकातें देती ॥ तेथें राज्ञीसमूह वस्ती ॥ लंका होई तव ते करिती ॥ प्रेमें आनंदास ॥ लंकेच्या हो० ॥२॥

कृष्णरावाचे स्नेही ४।५ असामी लंका बघण्यासाठीं त्यांस बोलाविण्याकरितां कृष्णरावाचे घरीं आले तेव्हां कृष्णराव आपली बायको राधाबाई इला विचारण्यासाठीं गेले असतां, ती ह्मणते—मला टाकून आपण जाणार काय? बायकांनीं जळ्ळं पातकच केलं वाटतं? पुरुषांनीं सर्व समारंभ बघावेत आणि बायकांनीं चुलीपाशीं सर्वकाळ काम करीत रहावें! तुमच्या अगोदरच ही मी तयार झालें पहा!

॥ पद ॥ जातें रिपु वधावया, आलें रिपु वधावया.

**जातें मिहि बघावया ॥ येतें मिहि बघावया ॥ आहें सिद्ध समयिं या ॥ मुलें घेउनि तोषवाया ॥ प्रियस्वामी, धामीं, कामीं, नामीं, माझिया बुद्धिला ॥ सुचत नांहीं, जाऊं नका पुत्रांसह मज त्यजुनियां ॥ जा० ॥ १ ॥**

हें तिचें भाषण ऐकून कृष्णरावांनीं तिला बायकांची चांगली संगत पाहून त्यांजबरोबर पाठविलें; व आपण मंडळीसह निघून गेले.

॥ साकी ॥ राग जोगी ताल धुमाळी.

**कृष्णराव मग स्वस्त्रियेची तर्तुद करुनी जाई ॥**
**सुसंगतीच्या अबलांसंगें प्रेमा बहुतचि येई ॥ १ ॥**

एका वाड्यांत गंगा, यमुना, गोदा, कृष्णा आदिकरून ७।८ बायका होत्या; अशा भव्य व धनवान् सावकाराच्या वाड्यांत लंका पहाण्यास जाण्याविषयीं, त्यांची सगुणा या नांवाची एक मैत्रीण आली व ह्मणते—

॥ पद ॥ जाऊं कामाला, चलाग दिवस किती आला.

**जाऊं लंकेला ॥ चलग काळ किती झाला ॥**
**गडबड करुनी, जन सारे ते, बघण्याला जाती ॥**

गंगाबाई उत्तर देते—

**लघु लघु बाळें मम सदनींही घाईतें करिती ॥**
**बघण्या घाईतें करिती ॥**

यमुना ह्मणते—

**स्वपतीचीही मजवर दृष्टी भारी आहे ती ॥**
**आज्ञोल्लंघन करितां मजवर रोषचि ते करिती ॥**

गोदा ह्मणते—अं: त्यांत काय आहे? रोज मी गंगेला जातें.

**गंगातटकीं स्नानालागीं नेहमीं मी जातें ॥**

सगुणा ह्मणते—

**आज लंकेची मौज कशी पहा बघण्याला मी जातें ॥**

त्या वेळीं गंगा, यमुना, गोदा इ० सर्व ह्मणतात. (एकदम)

**चलग चलग मी येतें ॥ १ ॥**

असें ह्मणून सर्व पंचगंगातटाकीं दारूकाम पहाण्यास निघून जातात.

॥ **साकी** ॥ राग जोगी ता० धुमाळी ॥

**गंगा, यमुना, गोदा, कृष्णा लंका बघण्या जाती ॥**
**गंगातीरीं सुस्थळ स्थाना पाहुनि तेथें रमती ॥ १ ॥**

ठकीचा नवरा राघवेंद्रराव, हा तिला रात्रौ बाहेर गर्दींत सोडण्यास कबूल नव्हता, व सोडणार नाहीं, ह्मणून तिनें आपले वडील बहिणीस सांगितलें कीं, अग आक्का, माझ्या मनांतून लंकेचा समारंभ पहावा असा हेतु आहे, मौज तर अप्रतिमच होणार, असें ऐकिलें; तर माझे यजमानांची परवानगी घेऊन मला तिकडे नेशील का?

॥ **पद** ॥ चा० ॥ आजि शेवटचा लाभचि हा ममतेचा ॥ राग पिलू ता० धु०

**बहुतचि मज, आशा झाली भगिनी ॥ लंकेतें देखिन नयनीं ॥ मम भर्त्यातें बोधुनि करुणें विनवुनी ॥ करिशिल तूं मम हित ह्मणुनी ॥ चा० ॥ तरि तुष्ट करिन मी तुजही गे ॥ त्वत्स्मरणचि राही मजही गे ॥ बहु भाग्याची स्पष्टचि मी जन्मूनी ॥ होइन लंका बघुनी ॥ १ ॥**

आपल्या बहिणीचें भाषण ऐकून तिला आश्वासन देऊन, लागलीच राघवेंद्रावाकडे जाऊन त्याची प्रार्थना करूं लागली.

॥ पद ॥ राग बखा ता० दीपचंदी ॥ चाल ॥ गर्भ्याच्या चालीवर.

मम मानस ऐसें होय, ठकिला नेइं लंकेला ॥ तव चरणीं नमितें काय, सुगुणें—फार शोभला ॥ सदय असुनि वचना—तें मानी ॥ जन जे विनविति त्यास ॥ पदयुगलीं मी तल्लिन झालें ॥ होऊं नका उदास ॥ व्हावें मान्य मला ॥ १ ॥

राघवेंद्रराव—

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

गंगातीरीं गर्दी भारी रीघ नसे जायास ॥
गर्दींतचि त्या संधि सांपडे, दुर्लभ ही चोरास ॥
ठकवुनि नेति जनां ॥ यास्तव चिंता वाटे मना ॥ १ ॥

ठकीची बहीण लक्ष्मीबाई—

॥ पद ॥ राग झिंजोटी ता० त्रिवट.

ओळखिलें ठीक आहे, त्वच्चिंता कोणती ॥ निष्ठुर ते स्तेन तेव्हां, तद्द्रव्या हारिती ॥ विश्वासा पात्र जैशी, अनुसूयावाणि ती ॥ करिं बुद्धी स्थीर तैशी, मम वाणीवरती ॥ १ ॥

राघवेंद्रराव ह्मणतो—

॥ पद ॥ चा० ॥ नको हरि निशीं बाहिर जाऊं.

जावें तुह्मीं गंगातीरीं लंका बघण्यालागूनी ॥ सांभाळावें, मम पत्नीला संगें बाळा घेवोनी ॥ जावें० ॥ १ ॥ अश्वोष्ट्रांच्या नृत्या बघुनी बाळें पळतिल कीं भिउनी ॥ तुह्मां सर्वांचा विरह न व्हावा ॥ ह्मणुनि सांगतों बोधूनी ॥ जा० ॥ २ ॥ अष्ट दिनांची रजा बघुनियां सर्वहि येती नृपसदनीं ॥ नोकरिवांचुनी ते जन किती येती बहुतचि दूरूनी ॥ जा० ॥ ३ ॥

ठकी व लक्ष्मीबाई आदिकरून बायका घांटावर आल्या, त्या वेळीं जिकडे तिकडे गर्दीनें मंडळी भरलेली पाहून, ठकी आपल्या बरोबर आक्काप्रभृति आलेल्या बायकांकडे पाहून ह्मणते—

॥ पद ॥ चा० ॥ नृप मम तारा–मावरती प्राणांहुनी बहु आहे ती.

जन बसती घांटावरतीं ॥ प्रेमातें धरुनी चित्तीं ॥ कुठें बसूं ॥
किति ब्रह्मपुरीवर दिसती ॥ बघण्याची धरुनी प्रीती ॥ कुठें बसूं॥
देउळावर ही कीती बहु मिळती पूलावरतीं ॥ कुठें बसूं ॥ चा० ॥
आसना, दिसति ज्या स्थाना, बसुनि कामना, अमित पुरवीती
तशि न दिसे कोठें जगतीं ॥ कुठें बसूं ॥ १ ॥

मग सर्व एका बाजूस बसल्या.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

दक्षिणासमाप्तीनंतर ॥ झुंडीच्या झुंडी येती अनिवार ॥
भूदेवांच्या त्या स्थानीं सत्वर ॥ मम मति कुंठित वर्णनीं ॥ १ ॥

स्त्रीसमुदायांतून राधा आपल्या मैत्रिणीला बोलली कीं, बाई, तिनिसांजपासून बसून बसून जीव कंटाळला, रात्र तीन तास होऊन गेली असेल, अजून महाराजांची स्वारी कां बरें येत नाहीं! आरंभ तरी केव्हां होणार!!

॥ पद ॥ राग भीमपलासी ता० धुमाळी ॥ चा० ॥ गड्यांनो कृष्ण गडी आपुला ॥

यामिनि सवाप्रहर सारी ॥ होतां गडबडती नारी ॥ सख्यांनो पाहुं नेत्रभरीं ॥ अझुनि तीं कां नये स्वारी मम मन कंटाळे भारी ॥ चला उठा जाऊं तरि घरीं ॥ चा० ॥ तटाकीं येउनि मी आतां ॥ राहिलें मनिं वाहुनि चिंता ॥ १ ॥

राधेच्या भाषणास दुसरी स्त्री उत्तर करिते, माझीही स्थिति खरोखर कशी झाली पहा!

॥ पद ॥ चाल ॥ शिवा, न लावीं हात मला.

मलाहि नाहीं धैर्य खरें ॥ स्थैर्यास बरें गृहिं जाऊं त्वरें ॥चा०॥ स्वारीची ती वाट बघुनी ॥ तगमग होतो जिव हा ह्मणुनी ॥ चा० ॥ राहिली मम वासना ॥ प्रेमभरें ॥ लंकेतें त्वरें ॥ पाहीन बरें ॥ मलाहि नाहीं धैर्य खरें ॥ २ ॥

असें बोलतात तोंच श्रीछत्रपतीची स्वारी आली. तेव्हां रस्त्यावरील दुकानांतील माड्यांवर बसलेल्या व खालीं बसलेल्या लोकांनीं स्वारी येतांच उठून मुजरे केले.

॥ श्लोक ॥ द्रुतविलंबित वृ. ॥

रमतही नृपती जयिं येतसे ॥
गमत इंद्र जसा नयनीं दिसे ॥
पटपटा जन सोडुनियां स्थळा ॥
नमन तें करिती मग शाहुला ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

बाण तारनळे आणि चंद्रज्योती । ज्यांची शोभा वर्णावी किती ।
बाण अंतरिक्षउच्चस्थानीं जाती । तेथून फुटती आपोआप ॥ १ ॥

॥ आर्या ॥

सणण ध्वनि ते ऐकुनी बाणांचे भीति लघुमुलें सारीं ॥
अवन करावयास्तव त्या पोटाशीं धरुनि बैसती नारी ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ताल धुमाळी.

अंतरिक्ष ते बाण फुटोनी तारे दृष्टिस पडती ॥
ताम्र पीत वर्णांहीं करुनी बहु रम्यचि ते दिसती ॥
सारें नभ भरलें ॥ पाहुनि जनां सौख्य झालें ॥ १ ॥

राधा ह्मणते अक्का, पाहिलेंसना? बाणांचा थाट किती सुंदर रमणीय केला आहे तो! मारुति, गरुड वगैरेंचीं चित्रें सुद्धां माझ्या दृष्टीस पडतात पहा!

॥ श्लोक ॥ मालिनी वृत्त.

तरुवर बहु तेथें मारुती आणि विष्णू ॥
गरुड वहन ज्याचें मित्र ज्या धन्य जिष्णू ॥
प्रकट मज प्रतीमा दीसती नेत्रयुग्मीं ॥
परम मनिं सुखावें उत्सवा देखुनि मी ॥ १ ॥

अक्का, आतां लंका तर झालीच, पण आतां गर्दी फार बाई, घराला तरी कसं जावं? हे लोक पहा—

॥ पद ॥ चाल—कंठ चरचर चिरुनि मारिन शिवसुता त्या. (झंपा)

लंका बघुनी पळती धडधड भव्य पंथामधुनियां ॥
गर्दिनें ते मार्ग भरले स्थळ नसे ही जावया ॥ ध्रु० ॥
क्रमण करितां घाइ घाई अंगस्पर्शा होतसे ॥
गमन मार्गीं जिकडे तिकडे मनुज वेष्टित ही दिसे ॥ १ ॥

मग गर्दी चांगली मोडल्यावर त्या बायका घरीं आल्या.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

गंगातीरापासोनी । अंबिकादेवालयापर्यंत जनीं ।
समग्र पंथा व्यापुनी । शोभता झाला अपूर्व हें ॥ १ ॥

याचप्रमाणें मार्केटापर्यंत सारखी मनुष्यांची गर्दी भरलेली होती; मनुष्यांला मनुष्यें ठेंचून गेलीं होतीं.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

तीरानजीक त्रय भव्य पंथ असती । जे मार्केटाचा मार्ग दाखविती ।
तेथें ऐशीच गर्दी असती । पद ठेवावया स्थळ नसे ॥ १ ॥

---

## भाग पांचवा.

ता० ४ ता० ५ ता० ६ इ० एप्रिल १८९४.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

नामदार आणि सहपरिवार छत्रपती । यांचे फोटो काढोनि घेती ।
दोन प्रहर झालिया वरतीं । देखोनि उल्हास होतसे ॥ १ ॥

ता० ४ एप्रिल १८९४ रोजीं सकाळीं नऊ वाजतां जुन्या राजवाड्यांत श्री० महाराज यांस करवीर इ० जहागीरदार यांजकडून मानपत्र देण्यांत आलें.

॥ साकी ॥ राग जोगी ताल धुमाळी.

जहागिरदार सर्व या स्थानीं मानपत्रा देती ॥
अत्यानंदा बहुतचि मानुनी, मान्य करी तो नृपती ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग व ताल सदर.

तिसऱ्या प्रहरीं जुने प्रासादीं, दरबारातें भरुनी ॥
आहेरासह मानपत्रें तीं, प्रेमें स्वीकारूनी ॥
तुष्टवि लोकांला ॥ नृपती मान्य जनां दिसला ॥ २ ॥

## प्रथम मानपत्र.

॥ ओवी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

दक्षिणेंतील सरदारांची सभा ॥ जिची पुण्यामाजी भव्य शोभा ॥
मानपत्राच्या धरूनि लोभा ॥ श्रेष्ठ देण्यांतें पातले ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

इचलकरंजिकर, रास्ते, चिटणिस, नातू तेही आले ॥
खासगिवाले सभेतर्फेनें, लगवग प्राप्तचि झाले ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ स्रग्धरा.

बाबासाहेब मोठा धनि इचलकरंजी वरें मानपत्रा ॥
वाची त्या उत्तरातें तनय कुवरजी मान्य जो राज्यतंत्रा ॥
आणी जीं मानपत्रें तदितर असती, योग्य त्या उत्तराला ॥
देवोनी भूपतर्फे अवचट वरुनी कीर्ति तो धन्य झाला ॥ १ ॥

## दुसरें मानपत्र.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

सार्वजनिक त्या सभेंचि दिधलें, तेव्हां मानपत्रा ॥
भिडे, कीर्तने, आणि गोखले, असति श्रेष्ठ त्या तंत्रा ॥
ऐकुनि साग्र वरें ॥ तुष्टति जन प्रेमें सारे ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांवरी.

गोखल्यांनीं तें पत्र वाचियेलें ॥
पोक्त तर्कें जें पूर्ण भरीयेलें ॥
जयामाजींही स्तौत्य फार साजे ॥
भूपतीची ती कीर्ति धन्य गाजे ॥ १ ॥

## तिसरें मानपत्र.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

तिसरे मानपत्राची धाटी ॥ डेक्कन एज्युकेशन सोसायटी ॥
प्रयत्नेंकरूनी देण्यासाठीं ॥ प्राप्त झाले ते ऐका ॥ १ ॥

॥ पद ॥ राग पिलू ता० धुमाळी. ॥ चा० ॥ उद्धवा शांतवन कर जा ॥

विद्वज्जन ऊभे होते ॥ पत्र तें देण्या तेथें ॥ वर्णितों नामें त्यांचीं जगिं प्रसिद्ध कीर्ती ज्यांची ॥ भांडारकर जो त्याची ॥ अति प्रीति शिष्यिं ती साची ॥ यासाठिं शिष्यप्रेमाची ॥ ठेविति त्या दृष्टी साची ॥ चा० ॥ काथवटे प्रोफेसर ॥ प्रिन्सिपाल आगरकर ॥ गोखलेचि प्रोफेसर ॥ ऐसे ते येती जेथें ॥ विद्व० ॥ १ ॥

॥ आर्या ॥

संस्कृतप्रायमर ज्यानें रचिलें तो वाचि मानपत्रातें ॥
शोभे बृहस्पतीसम मान्यचि जो सर्व शिष्यसत्रांतें ॥ १ ॥

## चौथें मानपत्र.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

चतुर्थ मानपत्र ऐकिलें ॥ डेक्कन असोशिएशनेंचि दिधलें ॥
पांचवें तें पत्र वाचिलें ॥ पुणें इंस्टिट्यूशन सभेनें ॥ १ ॥
षष्ठमातें वाचूनि दाखविती ॥ पूना नाईटक्लब् योग्य रीतीं ॥
सप्तमातेंही याच पद्धतीं ॥ चांद्रसेनीय कायस्थ ॥ २ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

अष्टमातें वाचूनि तोषवीती ॥
क्याथोलिक ते रोमन याच रीतीं ॥
वस्ति ज्यांची येथेंचि शोभताहे ॥
भूपकीर्ती जान्हवी साच राहे ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

नवम पत्राची ऐका स्थिती ॥ इंडस्ट्रियल असोशिएशनेंचि दाविती ॥
जिची पुणें राजधानींत वस्ती ॥ पेशव्यांच्या झाली असे ॥ १ ॥

॥ आर्या ॥

चित्रालयांतुनी मग रायाचा स्पष्ट काढुनी घेती ॥
फोटो पाहुनि नयनीं प्रेमाचे लोट मानसीं येती ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० रामजोशांचे चा०

जगद्गुरू स्वामीच्या मग ही, आहेरा स्वीकरी ॥ जयाची वस्ती संकेश्वरीं ॥ बडोद्कर महाराजा नयनीं पाहतां ज्याची सरी ॥ न दिसे भूमंडाळिं दूसरी ॥ आहेरातें अर्पण करुनी ॥ भूपतितें करविरीं ॥ गाजवी धन्य कीर्ति ती बरी ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमा०

त्रिचनापलिच्या कामगारें सुंदर जरतारिमाला ॥
आणिक दुर्लभ इकडे असती सुखकर त्या वस्तूंला ॥
अर्पुनि भूपतितें ॥ वदतों धन्यचि मी महितें ॥ १ ॥

नंतर वारांगनांचें गायन व नर्तन झालें.

॥ ठुंबरी ॥ राग–खमाज ता० पंजाबी ठेका ॥ चाल ॥ दधु बेचन मैना जाउ दया.

सकल जनीं होय कसा उल्हास स्फुरण नृत्यीं कसें घडे अप्सरांस ॥ सकल ज० ॥ ध्रु० ॥ गायनसमयीं जनतापहारी ॥ हावभावें सुखवि जनांस ॥ सकल ज० ॥ १ ॥ नग हेमाचे बहुत सुशोभित स्वशिरिं घालुनि तोषवि खास ॥ सकल० ॥ २ ॥ नृत्यकलेंतचि नयनां मुरडुनी ॥ हसत दावि मुखविलास ॥ सकल० ॥ ३ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दा०

तया समयीं मग विडे वांटिताती ॥
पक्क पर्णांनीं युक्त दीसताती ॥
पत्रि एला मिश्रीत शोभताहे ॥
रिद्धिसिद्धिही वारि जिथें वाहे ॥ १ ॥

दरबार खलास.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

हारतुऱ्यांतें वांटुनि तेव्हां आनंदातें करिती ॥
गुलाब अत्तर स्वीकारूनि मग उत्साहें जन जाती ॥ १ ॥

युरोपियन लोकांचा बॉल.

॥ आर्या ॥

नूतन प्रासादीं मग निशिमाजीं योग्य नर्तना करिती ॥
धरुनी हस्तपरस्पर इंग्लिश स्त्रीपुरुष रम्य ते दिसती ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ इंद्रवज्रा.

विद्युल्लतेचे दिप ते करूनी ॥
लावीत होते समया स्मरूनी ॥
रात्रींच त्याही दरबारहालीं ॥
शोभा पहातां मति गुंग झाली ॥ १ ॥

ता० ४ रोजींच तिसऱ्या प्रहरीं ३ वाजतां नव्या राजवाड्यांत आलेल्या पाहुणेमंडळीचे भेटीसाठीं दरबार झाला.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

सर्व अतिथि जे आले होते उत्साहालागोनी ॥
भूपति त्यांतें भेटुनि जहाला धन्य कसा या भुवनीं ॥ १ ॥
संस्थानिक ते भूपतिलागीं आहेरातें करिती ॥
स्वीकारी तो महदानंदें धन्य जयाची कीर्ती ॥ २ ॥

कामगार वगैरे लोकांस भोजन.

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दाद०

अंबिकेच्या चौकांत थाट झाला ॥
भोजनाचा तो नयनिं देखियेला ॥
पंचपक्कान्नें असति तया स्थानीं ॥
धन्य ऐकूनी ह्मणति सर्व कानीं ॥ १ ॥

॥ पद ॥ चाल ॥ कवणें तुज गांजियलें सांग सुंदरी ॥

बुंदिलाडु साखरभात, पुऱ्या त्या किती ॥ वांगिभात श्रीखंड–क्षीर दीसती ॥ बुं० ॥ चा० ॥ मठ्यातें सकल वरित ॥ चटण्याही विपुल असत ॥ रायतिं तंव अमित दिसत ॥ किती वर्णु तीं ॥ बुं० ॥ १ ॥

॥ पद ॥ राग पिलू ता० धुमाळी. ॥ चा० ॥ उद्धवा शांतवन करजा.

रंगावलि घालुनि नामी ॥ कशि शोभा आणीली ती ॥ देखतांचि या थाटाला ॥ जन सारे तृप्तचि होती ॥ येणाऱ्या मंडळिसाठीं, जन तिथें उभे किति असती ॥ संख्येची पहातां गणती ॥ पंचमची नयनां दिसती ॥ आदरेंचि आणुनि त्यांना ॥ नियमित स्थळा बैसविती ॥ केशरी तिलक लावाया ॥ जन कांहीं दृष्टिस पडती ॥ चा० ॥ संपतांचि भोजनातें ॥ जनकदंब जाई वरतें ॥ बंगला सुशोभित जेथें ॥ बैठका प्रेमें करिती ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

पानसुपारी हारतुऱ्यांदिक, गौरव तेथें केला ॥
अहेर सत्के आदी करुनी नृप बहु तुष्टचि झाला ॥१॥

मराठेमंडळीचा भोजनसमारंभ. ता० ९ माहे ए० गुरुवार १८९४.

जुन्या राजवाड्यांत सरदारलोकांना मेजवानी झाली. त्या वेळीं सर्व सरदार, जहागीरदार आले त्यांपैकीं थोड्या लोकांबद्दल वर्णन.

॥ श्लोक ॥ स्रग्धरा वृत्त ॥

शाहूराजाधिराजा प्रतिनिधिसह[1] ये भोजनालागिं जेव्हां ॥
बापूसाहेब शोभे शशिमुखवदनीं गोजिरायेचि तेव्हां ॥
बाळासाहेब मोठा गुणिजनसदनीं शोभतो योग्य हीरा ॥
येते झालेहि तैसे किति तरि नयनीं पाहुं मी मान्य वीरा ॥१॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

किती सरदार आणि मानकरी ॥
गणति ज्यांचीही होय जिथें भारी ॥
पट्टधारि ही भोजनीं तृप्त होती ॥
गौरवानें रायाचि कीर्ति गाती ॥ १ ॥

॥ अंजनीगीत ॥

जहागिरदार ते सत्वर येती ॥ षड्रसअन्ना सेवन करिती ॥
पक्वान्नांतें प्रेमें भक्षिती ॥ अत्यानंदानें ॥ १ ॥
सेवकजनही, तृप्त होउनी ॥ माथां पगडी सरसावूनी ॥
मिशीवरतीं हस्त फिरवुनी ॥ गमजाही करिती ॥ २ ॥

मुधोळकर घोरपडे येतात.

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ताल दादरा.

राजेसाबहि भोजनालागिं आला ॥
योग्य स्थानातें त्यासि बैसवीला ॥
भोजनांचें तें घेउनियां सूख ॥
सर्व प्रेमानें बघति भूपमूख ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

सरलष्करही भोजनमंडपिं येई त्या समयाला ॥
भोजन करुनी आल्हादभरें वर्णी उत्साहाला ॥
बोले धन्य बरा ॥ भूपचि रामराय दुसरा ॥ १ ॥

---

१ मे० दिवाणसाहेब हेच श्रीम० महाराज सरकारचे प्रतिनिधि.

ता० ९ रोजीं ४–४९ वाजतांचे गाडीनें ना० साहेब सहपरिवार महाबळेश्वरास जातात.

॥ कामदा वृ० ॥ श्लोक ॥

नामदार तो जाइ येथुनी ॥
प्राप्त लोक ते सर्व मीळुनी ॥
ह्माबळेश्वरीं, निश्चयें त्वरा ॥
जावया करी, मार्ग तो बरा ॥ १ ॥

॥ ओवी ॥ राग मल्हार.

सायंकाळच्या गाडींतून ॥ नामदारांचें गमन होणार ह्मणून ॥
लहानथोर भेटीलागून ॥ स्टेशनस्थानीं पातले ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

गौरकायांची दाटि बहू झाली ॥
प्रेक्षकांनीं त्यापरी गर्दि केली ॥
प्लॅटफार्मीं बैठका घालुनीयां ॥
भव्य शोभा दाविली आणुनीयां ॥ १ ॥

॥ पद ॥ राग–शंकराभरणा. झंपा प्रबंध ( भूपाळीचे चा० )

॥ चा० ॥ उठिं गोपालजी जाइ धेनूकडे याप्र०

निश्चितासमयिं त्या नामदारासह ॥ येतसे छत्रपति भूपतीही ॥ नि० ध्रु० ॥ सकल परिवारसह हॉरिस येऊनीयां ॥ पुसति ते प्रश्न बहु कुशलतेचे ॥ नि० ॥ १ ॥ नामदारहि तदा रेलगाडीं-तुनी ॥ बैसुनी चालले कीर्ति वरुनी ॥ साजरा सुदिन तो होय बघुनी ॥ २ ॥

गुरुवारीं ता० ९ रोजीं श्री० महाराज यांस सदर उत्साहाचे संबं-धानें श्रीबाबासाहेब पाटणकर यांनीं पानसुपारीस बोलाविलें व त्याच दिवशीं गरीब आंधळे पांगळे वगैरे लोकांस वस्त्रें वांटलीं व बायकांस खण व चुडे भरले.

॥ दिंडी ॥ राग—लीलांबरी.

पाटणाचा जो श्रेष्ठ अधीकारी ॥
बाबासाहेब हेंचि नामधारी ॥
अंध पंगू बधिरही याचकांसी ॥
देइ वस्त्रालंकारभूषणांसी ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग जोगी ताल धुमाळी.

दीन स्त्रियांतें कंचुकि वस्त्रा देउनि तोषवि भारी ॥
चुडेदानही स्वीकारुनियां रमतचि जाती नारी ॥
बुद्धी उत्साहीं ॥ प्रेमभरें तो वाही ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला०

पाटणकर निकटचि असती भूप घराण्यांतरीं ॥ बाबासाब मूर्ति दिसे गोजिरी ॥ ध्रु० ॥ छत्रपतीच्या दत्तविधानीं योग्य उत्साहा करी, चिंताभार घेउनियां शिरीं ॥ भूपतिच्याही विवाहकालीं प्रेम धरुनि अंतरीं ॥ आणिली किति शोभा साजिरी ॥ चा० ॥ स्वगृहीं नृपाचें आगमन होई ह्मणुनी ॥ अति सुरम्य कृत्रिम कमान द्वारीं करुनी ॥ मंडपीं सुशोभा आणि हंड्या टांगूनी ॥ चा० ॥ घडोघडी किती भूपासाठीं उत्सव जे करविरीं ॥ होति त्या प्रीतीनें आदरी ॥ पाटण० ॥ १ ॥ कारभारि बलवंतराय तो सौम्यगुणी भासतो ॥ पोतनिस उपनामें गाजतो ॥ करविरप्रांतीं अति हुद्यांचीं कामें करुनि धन्य तो ॥ लाभला सुस्थळिं मज वाटतो ॥ चा० ॥ आधींच सुगर पाटणकर वर देखिला ॥ त्यांतही कुशल अति मंत्री जो जोडिला ॥ दुग्धींच शर्करा मिश्रित तशि बुद्धिला ॥ चा० ॥ वाटुनि चित्ता आनंद झाला वर्णावें किति तरी। बाबासाब मूर्ति दिसे गोजिरी ॥ १ ॥

## शिष्टसंभावना.

॥ ओवी ॥ राग मल्हार.

मुक्त्यारीउत्सवानिमित्त ॥ रमण्याची दक्षिणा होत ॥
निमंत्रणावांचूनी कधीं न जात ॥ ऐसे विद्वान् पाचारिले ॥१॥

॥ आर्या ॥

शास्त्री वैदिक पंडित ज्योतिषि तैसेच सभ्य ते कीती ॥
प्रासादाचे स्थानीं निमंत्रणातें करुनि आणीती ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ पृथ्वी वृत्त.

जयास न रुचे सदा गमन ज्या नसे मान्यता ॥
निमंत्रण नसे कदा समय नावडे तत्वता ॥
अशांसहि निमंत्रुनी सदय धर्मराजापरी ॥
अखंड अवनीं धना विपुल देच कीर्ती बरी ॥ १ ॥

॥ आर्या ॥

त्रय चतुर्पंच दश त्या मुद्रा[1] देतीच योग्यता बघुनी ॥
विंशति पंचहि देउनी नम्रपणें धाडिती तया सदनीं ॥ १ ॥

॥ पद ॥ राग ललितगौरी ता० धुमाळी.

कधीं एक शत कधीं त्रिशतही, भूदेवां अर्पिती ॥ दक्षिणेलागीं प्रवर्तती ॥ प्रथम दिना पासोनि पहातां, काळाची परिमिती ॥ जहाली दिनसंख्या विंशती ॥ ब्रह्मवृंद ते धना सेवुनी, आनंदा मानिती ॥ नृपाचे कल्याणा चिंतिती ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ मंदाक्रांता वृत्त ॥

काशीखंडीं प्रविणचि खरे, वामनाचार्य आले ॥
दक्षीणेतें त्रिशत रुपये, देउनी तुष्ट केले ॥
तैसे केलें मुदित गवरीशंकरा याच रीती ॥
पुण्यश्लोका समचि गमली, धन्य ज्याची सुकीर्ती ॥ १ ॥

---

१ मुद्रा=रुपये.

॥ आर्या ॥

इंदुरवासी शास्त्री हरिनामें सुप्रसिद्ध आला जो ॥
स्वीकारुनि धन झाला द्विशतचि धनदासमान राजा जो ॥१॥

ब्राह्मण श्री० महाराज यांस आशीर्वाद देतात.

*॥ श्लोक ॥ अनुष्टुप् छंद.

शाहुः सिंहासने भूयादायुष्यं हि शतं समाः ॥
पालयन्प्रकृतीः सर्वाः सत्यन्याय पराक्रमैः ॥ १ ॥
सिसोदाख्यं प्रसिद्धं यद्गोत्रं काश्यपसंज्ञितं ॥
भोसुले कुलमाख्यातमाचंद्रार्कं विवर्द्धतां ॥ २ ॥

श्रीमन्महाराज यांणीं अहेर केले ते.

॥ पद ॥ चा० ॥ बघुनि सुभद्रेला क० ॥

बघुनि समयातें ॥ देती अहेर सरदारातें ॥ कित्येकांतें भरजरी दिधले ॥ कित्येकांनीं किनखाप वरिले ॥ शालहि एकीं अंगिकारिले ॥ मान्य जया होतें ॥ देती अहेर० ॥ १ ॥

श्री० महाराजांजवळ असणारे—भालदार, चोपदार, हुजरे, पट्टेवाले इ० निवडक लोकांना सरकारांतून उंचीउंची पोषाख त्यांच्या कामगिरीलायक मिळाला; त्यांतील कांहीं पोषाखांची किंमत ८०।९० वर आहे.

॥ साकी ॥ राग जोगी ता० धुमाळी.

भालदार, चोपदार, हुजरे, पट्टधारि बहु असती ॥
भूपतिसन्निध वास निशिदिनीं प्रीतीनें जे करिती ॥
वस्त्रें देती उंची हो ॥ जगांतचि कीर्ति साचि राहो ॥ १ ॥

---

* हे संस्कृत श्लोक दुसरे बुकांतील (उतारा) आहेत. स्वकृत नव्हत. याच श्लोकांबद्दल मे० अ० ज० रावसाहेब वि० ब० गोखले यांनीं चरण दुरुस्त करण्यास सांगितलें व आपले शेऱ्यांत Metre (sentiment &) इत्यादि लिहिलें; त्यावरून शुद्ध करण्यास १।२ विद्वानांकडे गेलों तेव्हां ते बोलले कीं जर हे दुसरेकडील श्लोक तुह्मीं घेतले आहेत तर त्यांत बदल करण्याचें कारण नाहीं. मलाही विशेष वाटाघाट करण्यास सवड झाली नाहीं.

## कुस्त्या.

॥ आर्या ॥

कुस्त्या तेथें झाल्या दशत्रयांहुनि पंचही अधिक ॥
बघण्या गर्दी झाली स्थळ न उरे घूसण्या जिथें मशक ॥ १ ॥

॥ साकी ॥ राग–जोगी ता० धुमाळी.

टांग, कलाजंग, दस्ती, स्वारी, ऐशा पेचा करिती ॥
मल्ल जेठि ते लांग चढवुनी ॥ भूपातें रमवीती ॥
नृपती थोरचि हा ॥ देतो बक्षिस कैसें पहा ॥ १ ॥

॥ पद ॥ राग–शंकराभरणा चा० कंठ चर चर चिरुनि मारिन शिवसुता त्या निश्चयें॥

मल्ल जे जे विजयि होती त्यांसि तोषवि भूपती ॥ इच्छा जैशी असति मनींची तैशि सिद्धि पावती ॥ मल्ल ध्रु० ॥ बांधिती शिरीं पागुटीं किति मंदिलाही वेष्टुनी ॥ शृंखलांनीं रजतरूपी शोभले किति या जनीं ॥ १ ॥

शहरांतील सर्व शाळेंतील विद्यार्थ्यांस खासबागेंत मिठाई वांटली.

॥ कटाव ॥

खासउपवनीं शोभा दिसती ॥ मिठाईची वर्णूं कीती ॥ विद्यार्थीजन अवघे येती ॥ परस्परांतें बोलताती ॥ आनंदानें पेढे भक्षिती ॥ किती बर्फी चट्ट करिती ॥ किती उत्साहानें येती ॥ आईपुढें पुडे ठेविती ॥ स्वसेलाही अर्पण करिती ॥ लघु बंधूतें याच रीती ॥ शेषातें मग मुखीं टाकिती ॥ कदलिफळातें गृहीं आणिती ॥ कोणी तेथें तैशि भक्षिती ॥ इक्षुदंड ते करीं घेउनी ॥ गडबडीचें बंड मोडुनी ॥ दुष्ट वासना प्रचंड त्यागुनी ॥ बहुतांवरतीं खंड करुनी ॥ विद्यार्थी गृहिं जाती ॥ गात नृपाची कीर्ती ॥ १ ॥

कोणी एक गंगाबाई नांवाची स्त्री पुष्पें आणावयासाठीं खासबागेंत गेली होती, तिनें हा मिठाईचा समारंभ दुरून पाहिला व बराच

वेळ तिथें फुलें तोडून घरीं यावयास निघाली तों तिची मैत्रीण यशोदाबाई हिनें तिला आपले घरीं हाक मारून विचारिलें कीं, खासबागेंत कशी काय मौज जहाली ? मिठाई वांटलेली समजलीच, पण, आणखी काय झालें ?

तेंव्हां गंगाबाई—

॥ पद ॥ राग देसकार चा० भूपाळीचे चालीवर.

राजारामविद्यार्थी असती सादर नृपपायीं ॥ मानपत्र देऊनि मानिती तोष बहू हृदयीं ॥ छत्रपती भूपतिचें वर्णन किति करिती बाई ॥ ऐकियलें मीं पुष्पालागीं उपवनिं जायिं जाईं ॥ १ ॥

## परिशिष्ट.

श्रीमन्महाराज शाहू छत्रपति यांचे आंगीं आजपर्यंत जे उत्तम गुण वास्तव्य करितात त्यांबद्दल वगैरे वर्णन.

॥ श्लोक ॥ शार्दूलविक्रीडित.

अश्वारोहणिं बैसुनी किति रितीं पोलोक्रिडा आयुधीं ॥
बापूसाब, रिसालदार, सकलां श्रेष्ठादि लोकांमधीं ॥
क्रीडा त्या करुनी, यशा मिळवुनी आनंद मानी मनीं ॥
वाढो शाहु महाप्रताप मिरवो भानुप्रभेच्याहुनी ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० शैवालें युक्त जैसें पं०

पोलोच्या क्रीडेमध्यें, त्वद्वंधू दीसला ॥ श्रेष्ठांच्या संमतीनें, पहिला जो ठरला ॥ त्याच्याशीं साम्य करीतां, जिव ज्याचा रमला ॥ ऐसा तो भूप शाहू आजि नयनीं देखिला ॥ १ ॥

॥ पद ॥ दिसली पुनरपि गुप्त जहाली प्रिया सु०

अश्वारोहणीं गुंग जहाली ॥ मती जनांची देखूनी ॥ अश्वा० ॥
आला वारू गेला कोठें, बुद्धि खुंटली पाहूनी ॥ अश्वा० ॥ १ ॥
धाडस कृत्या बघुनि नृपाच्या अबलाही साशंक मनीं ॥ धैर्यवान ते मौन सेवुनी स्वस्थ बैसती अधोवदनीं ॥ अ० ॥ २ ॥ शर्यत

जिंकुनी स्वारी आली ॥ गर्जति दुंदुभिनादध्वनी ॥ बलवत्क-
विला ऐकुनि कर्णीं झाला हर्ष बहुत मनीं ॥ अश्वा० ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ शिखरिणी वृ०

शिकारीला स्वारी निघत जइं अंबे नमुनियां ॥
मृगांतें व्याघ्रांतें टपत बलवाना बघुनियां ॥
यशातें स्वीकारी हनन करुनी दुष्ट पशुला ॥
न देखे शाहूसा प्रथम दुसरा आज मजला ॥ १ ॥

॥ दिंडी ॥ राग लीलांबरी ता० दादरा.

मल्लयोद्ध्यांची हौस जया भारी ॥
मल्ल जंगी येतात राजद्वारीं ॥
तयां नेमुनियां योग्य तीच जोडी ॥
द्रव्य देउनियां लावितसे गोडी ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ मालिनी वृत्त.

अभिरुचि करयुद्धीं जैशि वाटे मनाला ॥
प्रखरतर निशाणीं तैशि साधे तयाला ॥
स्वजन तंव तयाचे मानिती धन्य ज्याला ॥
ह्मणुनि बहुत वाटे हर्ष माझ्या जिवाला ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला०

शाहुप्रभूचें दयालुत्व तें वर्णन करितों पहा ॥ जयाची करविरीं सत्ता महा ॥ हांकेसरशी उडी घालुनी, शांत करितो दहा ॥ जनांचा कैवारी तो आहा ॥ चा० ॥ बोर्डिंग जेव्हां ढासळलें, अंतरीं ॥ किति अश्व पतन पावले, भरजरी ॥ दहा मुलें गवसलीं सांगूं, किति तरी ॥ चा० ॥ वार्ता ऐशी ऐकुनि तेव्हां निमिष न लवतां पहा ॥ उठला मुक्त कराया दहा ॥ हांकेस० ॥ १ ॥ भान वाहनीं नसुनि निघे तों, टांगा दृष्टिं देखिला ॥ सत्वर दूतांनीं आणिला ॥ लगबग जाउनी त्या स्थानाला, मुक्त करुनि त्या

दहा ॥ हयांसह केलें कौतुक पहा ॥ चा० ॥ लेंकरां धुगधुगी उरली, देखुनी ॥ तत्काळ दवाखान्यातें, नेउनी ॥ शुश्रुषाहि करण्यालागिं सांगुनी ॥ अशा प्रीतिनें दश बाळांचे प्राण रक्षिले पहा ॥ जयाची कीर्ति दिगंतरिं महा ॥ हांकेस० ॥ २ ॥

॥ पद ॥ चा० ॥ बलसागर तुह्मी०

वाडिक्षेत्रीं स्वारि शाहुची थाटानें आली ॥ शाहुची था० ॥ कृष्णातीरीं स्नान कराया भावें राहीली ॥ कराया भा० ॥ स्त्री-पुरुषांची पहाण्या गर्दी एकचि जाहाली ॥ ग० ॥ आनंद मानुनी बलवत्कविनें कीर्ती गाईली ॥ क० ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० साध्य नसे मुनिकन्या.

श्रेष्ठ नसे दुजा राजा, यासम मजला भासत नाहीं ॥ श्रेष्ठ न० ॥ बघुनि शाहुच्या विविध विलासा ॥ मम मन घेई बहु उल्हासा ॥ पीडा हरति मनाची ॥ ऐसें सहजचि भासे हृदयीं ॥ श्रे० ॥ १ ॥ मृगयेमध्यें श्रेष्ठ असे तो ॥ अश्वारोहणीं तैसा गमतो ॥ जणुं तो रामचि भासे ॥ ऐसें मम मन ध्यासचि घेई ॥ श्रे० ॥२॥

॥ पद ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला०

दयाभूत सेक्रेटरि सबनिस नृपतीतें लाधला ॥ भूपती प्रीतिवरुनि शोभला ॥ आंग्लविद्येनें पूर्ण असूनी, संस्कृतही बुद्धिला ॥ मुखोद्गत वागे सकलहि कला ॥ चा० ॥ भूपती मूर्ति ती आधिं पहा सद्गुणी ॥ यांत ही जोडिली सेक्रेटरी वाणी ॥ कालिदाससम जी रत्नांची खाणी ॥ चा० ॥ द्वयमूर्तींचा ईशकृपेनें, संगम जो पाहिला ॥ पाहिजे दीर्घ काल राहिला ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० उद्धवा शांतवन कर०

अंबिके दीनदयाळे, ऐकावें मम वचनाला ॥ औदार्य या भूपतिचें, निरखुनी दिल खुष जहाला ॥ यासाठिं नमुनि चरणांला, मागतों दान हें तुजला ॥ शाहूस पुत्ररत्नाला ॥ देउनी

तोषविं मजला ॥ चा० ॥ याचकजन येती त्यांचे ॥ पूरवीं मनोरथ साचे ॥ उमजुनी त्या योग्याचे ॥ आदरीं पुण्य पथाला ॥ अंबिके ॥ १ ॥ किति वर्णुं याच्या गुणातें ॥ जनसमूह लंपट सातें ॥ तरि पुण्यशील भूपातें॥वृद्धि दे आयुष्याला ॥ अंबिके ॥२॥

काव्यकर्त्याची विद्वज्जनांस प्रार्थना.

॥ पद ॥ चा० ॥ धन्य उषा ती वाणकन्यका अति लावण्याची खाणी ॥ किंवा—वेदामाजी वडवड ऐशी करुनी आह्मां नागविती ॥

कवितारूपानें मी वदलों जेंवि भ्रमर तो कुसुमाला ॥ वर्णन करितां पुरली आशा सिद्ध मनोरथ मग झाला ॥ जैसा हंस त्यागुनी जलातें स्वीकारीतो दुग्धाला ॥ विद्वज्जनांनीं गुणचि वरावे बलवंताच्या काव्याला ॥ १ ॥

सकल जनांस प्रार्थना.

॥ पद ॥ चा० ॥ नको हरि निंदि वा०

या दीनावर रोष नसावा, ह्मणुनि प्रार्थितों सकलांला ॥ध्रु०॥ व्यक्तिमात्राचें वर्णन करितां पावे ग्रंथचि वृद्धीला ॥ या दीनाव० भारतसम वा ज्ञानदेवकृत ज्ञानेश्वरि जन ह्मणति जिला ॥ ऐसा ग्रंथचि वाढे ह्मणुनी॥भिडनि गाळिलें बहुतांला ॥ या दी० ॥१॥ विद्वद्रत्नें वर्णन केलीं व्यक्तरुपें जीं समयाला ॥ योग्य भासलीं ह्मणुनि वानिलीं ॥ ग्रंथांतरिं मम बुद्धीला ॥ या दीना० ॥ २ ॥ पुण्यशील आणि दीर्घविचारी ॥ दूषण नच ठेविति कविला ॥ ऐसें मन्मनिं खास वाटतें ॥ वहावें किमर्थ चिंतेला ॥ या दीना० ॥ ३ ॥ काव्य रचाया मम मति कीती ॥ स्पष्ट सांगतों तुह्मांला ॥ जगन्नियंता त्याची शक्ती सर्वमान्य बलवत्कविला ॥ या दीना० ४

परमेश्वरप्रार्थना.

॥ पद ॥ चा० ॥ वेदामाजी वडवड ऐशी करुनी आह्मां नागविती.

त्वन्महिमा तो अतकर्य दिसतो गुण वर्णी तो भारि विधी ॥ श्रुतिज्ञ असुनी वाचे वदतो केंवि स्तविल ही असुची धी ॥ पड्-

शास्त्रां तो अंताचि नलगे चारी वेदांची बुद्धी ॥ कुंठित झाली तुज स्तवितांना पात्रीं गवसे कां उदधी ॥ अष्टादश तीं थकुनि राहिलीं भूधर घेउनियां अवधी ॥ सहस्त्रमुखानें वर्णन करितां नाहिं लब्ध कोणा सिद्धी ॥ साधुजनाश्रय होई जरि तरि प्राप्त होय ती बरि संधी ॥ वंदि पाउलें संतजनांचीं बलवत्कवि हा बहु फंदी ॥ १ ॥

॥ पद ॥ राग देस ॥ चा० ॥ नको हरि निशिं बाहिर जाऊं ग० ॥

दीनदयाळा प्रभु राया रे ॥ त्वद्भजनीं मन नच रमलें ॥ धनसुतदारासक्त होउनी विषयमत्तकरीं कसें जडलें ॥ दीनद० ॥ १ ॥ लक्ष चौऱ्यांशी योनि हिंडतां विषयीं कैसें नच विटलें ॥ दीपावरतीं पतंग जैसा तैशापरि हें मन भ्रमलें ॥ दीनद० ॥ २ ॥ अभिरुचि विषयीं जैशी असते तद्वत ईशपदीं बसलें ॥ धर्म अर्थ कामादि मोक्षही रावति चारी गृहिं गमलें ॥ दीन० ॥ ३ ॥ तव कृपेचा लेश मिळे जरी चंचल मनही किति असलें ॥ स्थैर्य पावुनी तव पदिं राहे ऐसें व्यासादिक वदले ॥ दीन० ॥ ४ ॥ कृपा करा मजवरतीं आतां अजामिलादिक तारियले ॥ महत्पापी तैसा मीही, असुनि त्वत्पदीं मन वसलें ॥ दीनद० ॥ ५ ॥ बलवंताची करुणा येवो दयाघना तुज प्रार्थियलें ॥ मुमुक्षु जन जे प्राप्त जहाले, त्वत्पदिं त्यांना उद्धरिलें ॥ दीनद० ॥ ६ ॥

॥ पद ॥ चा० ॥ भला जन्म हा तुला लाधला ॥

साधुजनांना अश्रित पद हें स्पष्ट मनाला दिसे ॥ सदाशिव मानसिं वसतें कसें ॥ दासा अपुल्या प्रेम करूनी, कलिमलअंता कसें, करी तें त्वत्पद हे भरवसे ॥ दातेजनांमधिं श्रेष्ठ शिरोमणी त्वत्सम कोणी नसे ॥ कवीला अवगत हेंही असे ॥ चंचल मन हें भृंग होउनी विचरे आवडे तसें ॥ मानसीं षड्रिपु ते काकसे ॥ तुजविना, दिना, या जना, कोण उद्धरी ॥ अच्युता, केशवा, मधु-

सुदना, मूरारी ॥ दृष्टिला अखंडचि मूर्ती ही साजिरी ॥ चा० ॥ राहो माझ्या मन्मानिं ऐसें किति प्रेमें वसतसे ॥ चतुर्भुजरूप गोजिरें दिसे ॥ साधु जना० ॥ १ ॥

॥ पद ॥ चा० ॥ आज शेवटचा लाभचि हा ममतेचा ॥

मम जीवित तें व्यर्थचि गेलें श्रमुनी ॥ सार्थकही केलें नसुनी ॥ स्नानसंध्या*दी कर्में तीं वर्जूनी ॥ राहिलों विषय सेवूनी ॥ चा० ॥ करिं कृपा दिनावर आतां ही ॥ त्वत्प्रेम निरंतर मनिं राही ॥ चा० ॥ बहु चिंतेचा ध्यासचि हा लागोनी ॥ राहिला निववि भेटोनी ॥ १ ॥

॥ पद ॥ राग—गौरी झिंजोटी ता० दादरा ॥ चा० ॥ देवी श्रीव्हिक्टोरिया या चा.

शाहु नृपश्रेष्ठाचें हित तें करा ॥ हाचि भाव उमजे मनीं श्रीमहेश्वरा ॥ शा० ॥ नृपति असा न दिसे कधीं स्फटिंत हिरा ॥ भासतसे मंडित गुणिमाजिं नृपवरा ॥ नारी नर देखुनियां मानिती बरा ॥ शंकरा ॥ सुखकरा ॥ दे वरा ॥ प्रार्थितसें पदकमळा ॥ हाचि दे वरा ॥ शाहुनृ० ॥ १ ॥ दैवोदयिं प्रजाजनां योग्य लाभला ॥ उत्सविं या सकल जनीं फार शोभला ॥ जी, सी, एस्, आय असा किताब लाधला ॥ त्रिदशा ॥ आशा ॥ पाशा ॥ करि दमना ॥ भवहरणा ॥ मम शरणा इंदुशेखरा ॥ शा० ॥ २ ॥ राज्यभारवाहनिं कदा नाहिं दुखविलें ॥ अधिकारमदें कधीं कुणा नाहिं जाचिलें ॥ सकलांनीं प्रेमभरें ज्यासि मानिलें ॥ देवा ॥ धांवा ॥ पावा ॥ करिं करुणा ॥ कृपाकरा । भया हरा ॥ रक्षि नृपवरा ॥ शाहुनृ० ॥ ३ ॥

**समास.**

---

* संध्या—केवळ आचमनें टाकून कवाईत केली ह्मणजे संध्या होते असा अर्थ नाहीं, तर संध्या ह्मणजे परमेश्वराचें एकाग्र चित्तानें किंवा सम्यक् प्रकारानें जें ध्यान करणें त्याचेंच नांव संध्या. (अत्यक्त भक्ति=दृढतर.)

# या पुस्तकास आगाऊ आश्रय दिला त्या आश्रयदात्यांचीं नांवें.

श्रीमन्महाराज छत्रपति सा० सरकार करवीर ... ... ... ३००
मे० रा० ब० बळवंतराव नारायण जोशी चीफ् जज्ज को० ... ४
मे० रा० ब० राजाराम खंडेराव वैद्य माजी सरसुभे ... ... ४
मे० भाऊसाहेब तांबे प० अ० इंजिनियर, कोल्हापूर... ... १
मे० लेडी सुप्रिंटेंडेन्ट ग्यर्लस्कूल, कोल्हापूर ... ... ... २
रा. रा. कारभारीसाहेब निसबत सरलष्कर ... ... ... ५
रा. रा. कारभारीसाहेब निसबत जोशीराव ... ... ... २
,, ,, भीमराव केशवराव जगताप, अपकारी सबइन्स्पेक्टर ... ५
,, ,, रघुनाथ विष्णु वैद्य, अपकारी सबइन्स्पेक्टर, पेटा गडइंग्लज ५
,, ,, परशुराम शिवराम जमनीस १
,, ,, दाजी वामन सरदेसाई, चिटणीस सरसुभे आफीस ... १
,, ,, गोपाळ चिंतामण कोडोलकर हेड कारकून नि० सरसुभे आफीस १
,, ,, गोविंद व्यंकाजी, जिल्हा सरव्हेयर ... ... ... १
,, ,, बाळाजी कृष्ण कोलटकर क्लार्क नि० सरसुभे ... ... १
,, ,, रामचंद्र कृष्ण राशिंगकर कारकून स० ... ... ... १
,, ,, श्रीधर शंकर श्रीखंडे ... १
रा. रा. विसाजी बल्लाळ सिद्धये ... १
,, ,, बळवंत नारायण आपटे ... १
,, ,, बाबुराव गोपाळ दातार ... १
,, ,, गोविंद विष्णु मंकणी ... १
,, ,, बळवंतराव पारगांवकर ... १
,, ,, लक्ष्मण शिताराम फडणीस... १
,, ,, कृष्णाजी रामचंद्र खुपेरकर... १
,, ,, दत्तो बाळाजी अडके ... १
,, ,, बाबा यलेकर ... ... १
,, ,, बळवंत कृष्ण कमळाकर ... १
,, ,, माधवराव हेरलेकर... ... १
,, ,, बाळाजी सखाराम ठिकपुरलीकर ... ... ... ... १
,, ,, वासुदेवराव वडक शिवालेकर भा० कार० ... ... ... १
,, ,, नरसो गोविंद ह्मैसकर, हेड इन्स्पेक्टर, मुन्सिपाल कमेटी, कोल्हापूर ... ... ... १०
,, ,, व्यंकटेश जयराम सबरजिष्टर, पे० शिरोळ ... ... ... १
,, ,, रामचंद्र यल्लापा धनवडे, डाक्तर गारगोटी ... ... ... १
,, ,, वासुदेव रामकृष्ण आळेकर, डाक्तर ... ... ... १
,, ,, रायगोंडा खानगोंडा पाटील, मौजे पट्टणकोडोली पे. अ० ... १
,, ,, गंगाधर नारायण कुळकर्णी १
,, ,, दामोदर बाळकृष्ण कुळकर्णी १
,, ,, विष्णुभट भाऊभट जोशी १
,, ,, सखारामभट नानाभट जोशी १

रा. रा. वासुदेवभट नागेशभट जोशी, इंगळीकर ... ... १
,, ,, नरभट गोपाळभट जोशी सांगवडेकर ... ... ... १
,, ,, कृष्णा आनंदा पतंगे ... १
,, ,, तुकाराम बयाजी कुडाळकर १
,, ,, तवनापा पदमापा मगदूम ... १
,, ,, हुसन शेखजी जमादार ... १
,, ,, महादेव विठू मोंगले ... १
,, ,, तात्या श्रीपत देसाई ... १
,, ,, गोविंद मनोहर सोनार ... १
,, ,, गोपाळ सखाराम जोशी, मुक्काम कोकरूड ... ... १
,, ,, कृष्णराव सदाशीव दिवाण... १
,, ,, विष्णु गोविंद फडणीस कऱ्हाड १
,, ,, बाळकृष्ण वासुदेव शिखरे ... १
,, ,, श्रीमंत दत्ताजीराव भोंसले खानवटकर ... ... ... २
रा. रा. बंडू महादाजी मिसाळ हे० फा० अळतें ... ... ... १

रा. रा. देवगोंडा भुसगोंडा पाटील अळतें ... ... ... १
,, ,, अर्जोजिराव पाटील वडगांव १
,, ,, दामोदर विष्णु चरणकर, हेड-मास्तर पट्टणकुडी पे० गडइंग्लज १
,, ,, नरहरराव मुदवेडकर, खानापूर १
,, ,, कृष्णाजी रामचंद्र कुळकर्णी, गारगोटी ... ... ... १
,, ,, रामचंद्र आपाजी नलवडे पाली १
,, ,, गोपाळ कृष्ण कडवेकर दिवशी १
,, ,, संगापागुरु बसापा वेलमली, होंवाळ ... ... ... १
,, ,, गुंडभट देवणभट बेलगुपी ... १
,, ,, जिवणभट नारायणभट उग्रद १
,, ,, विष्णु नरसिंह जोशी स्टेशन-मास्तर, होम्वाळ ... ... १
,, ,, दत्तो दाजी अ० स्टेशनमास्तर १
,, ,, अच्युतराव श्रीनिवास कटकी क्लार्क गव्हर्मेंट प्लीडर, धारवाड १

**पत्ता**—बाळाजी महादेव करवडे, हेडमास्तर पट्टणकोडोली पे० अळतें यांजकडे, किंवा कोल्हापूर येथें मुलींच्या मुख्य शाळेंत दत्तात्रय महादेव करवडे यांजकडे मिळतील.